# मराठी भाषेचें मध्यम व्याकरण.

हा ग्रंथ

मराठी भाषा शिकणारांच्या उपयोगाकरितां

**कै० रावजी सदाशिव शास्त्री गोडबोले**

माजी मराठी ट्रान्सलेटर व दक्षिणाप्राइझ कमिटीचे सेक्रेटरी

यांनीं

**रा. रा. नारायण शास्त्री साठे**

पुणें ट्रेनिंग कालेजांतील शिक्षक

आणि

**रा. रा. नारायण धोंडदेव जोशी**

धुळें ट्रेनिंग कालेजांतील शिक्षक

यांच्या साहाय्यानें केला

तो

**हरि गणेश गोडबोले बी. ए.**

हेडमास्तर रत्नागिरी हायस्कूल

यांनीं

शोधून प्रसिद्ध केला.





सन १८९७ इसवी.

किंमत दहा आणे.

# प्रस्तावना.

तो० कै० रावजी सदाशिव शास्त्री गोडबोले, माजी मराठी ट्रान्सलेटर व दक्षिणाप्राइझ कामिटीचे सेक्रेटरी, हे ह्या ग्रंथाचे उत्पादक आहेत. रावजी शास्त्री हे सरकारी कामावर असतांना सन १८८९ चे सुमारास कै० राव बहादूर दादोबा पांडुरंग ह्यांच्या लघु-व्याकरणाची पुनरावृत्ति काढण्याचा प्रसंग आला, तेव्हां सद्यः स्थितीला अनुसरून त्यांत विषयासंबंधानें पुष्कळ फेरफार करणें इष्ट आहे असें मेहेरबान चाट्फिल्ड साहेब, मुंबई इलाख्यांतील विद्याखात्याचे डायरेक्टर, ह्यांस सुचविण्यांत आल्यावरून साहेब बहादुरांनीं रावजी शास्त्री ह्यांस नवीन व्याकरण करण्यास सांगितलें, व त्या अन्वयें सदरहू पुस्तक तयार करण्यांत आलें आहे.

मराठी भाषेची संक्रमणस्थिति अद्यापि चालू आहे व पुढें बराच काळपर्यंत ती चालू रहाणार. अशा स्थितींत कोणतेंही व्याकरण अपुरें व सदोष राहणारच. तथापि थोडक्यांत पद्धतवार व शास्त्रोक्त विवेचन ज्यांत केलें आहे अशा मराठी भाषेच्या व्याकरणाची उणीव प्रत्येकास भासत आहे. ही उणीव अंशतः तरी भरून निघावी असा ह्या व्याकरणाचा उद्देश आहे.

तो० रावजी शास्त्री यांची प्रकृति मूळपासून किती अशक्त होती हें सर्वांस महशूर आहेच. १८९ साला-

नंतर ते फारच थकत चालले व अखेरीस १८९१ सालीं त्यांस मृत्यूनें गांठलें. तरी शालाखात्याच्या उपयेगाकरितां शरीराकडे लक्ष्य न देतां १८८५ सालीं त्यांनीं केवळ दोन विद्वान् मित्रांच्या जोरावर ह्या व्याकरणास आरंभ केला. ते दोघेही मराठी व संस्कृत भाषेंत पारंगत असून ट्रेनिंग कालेजांत हे विषय शिकविण्यांत त्यांनीं सर्व आयुष्य घातलें आहे. ह्यांपैकीं **रा. रा. नारायण शास्त्री साठे** हे पुण्याचे ट्रेनिंग कालेजांत अध्यापक आहेत, व **रा. रा. नारायण धोंडदेव जोशी** हे धुळ्याचे ट्रेनिंग कालेजांत बदलून गेले आहेत. सर्वथैव ह्या दोघा पंडितांच्या मदतीनें १८८७ अखेर हा ग्रंथ पुरा झाला. तेव्हांपासून हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याचें काम अनेक अपरिहार्य अडचणीमुळें ह्या वेळपर्यंत तसेंच पडून राहिलें होतें.

हें व्याकरण मराठी शाळांतून सहाव्या इयत्तेपर्यंत, हायस्कुलांतून म्याट्रिक्युलेशन व स्कूलफायनल परीक्षेपर्यंत व ट्रेनिंग कालेजांत पहिल्या वर्षाच्या परीक्षेपर्यंत उपयोगी पडेल अशा बेताचें आहे. हा ग्रंथ होईल तितका चांगला, उपयोगी व लोकमान्य व्हावा अशी **कै० रावजी शास्त्री** यांची उत्कट इच्छा होती. व तदनुसार पहिली आवृत्ति छापून निघाल्यावर त्यावर विद्वान् लोकांची जी टीका होईल त्या सर्वांचा पूर्ण विचार करून दुसरी आवृत्ति काढण्याचा त्यांचा विचार होता. परंतु तसा योग त्यांच्या हयातींत आला नाहीं, ही मोठ्या

दुर्दैवाची गोष्ट होय. तथापि मराठी भाषेचा अभिमान बाळगणाऱ्या सर्व मित्रांनीं हें पुस्तक एकदां समग्र मननपूर्वक वाचावें व सूचना पाठवून देण्याची अगत्य कृपा करावी, ह्मणजे दुसरी आवृत्ति काढितेवेळीं त्या सर्व सूचनांचा योग्य विचार करण्यांत येईल.

ह्या ग्रंथाचें सर्व श्रेय **रा. रा. नारायण शास्त्री साठे व रा० रा० नारायण धोंडदेव जोशी** ह्यांजकडे आहे, व त्यांचे मदतीवांचून हा ग्रंथ सांप्रतचे स्थितींत कधींच आला नसता. तेव्हां ह्या ग्रंथासंबंधी मालकी वगैरे सर्व हक्क ह्या दोन पंडितांकडे व **ती० रावजी शास्त्री** यांच्या दोघां चिरंजीवांकडे आहेत.

**परिशिष्ट पहिलें** यांतील नामांची विभक्त्यंत रूपें नियम ८२ नंतर द्यावयाचीं होतीं; परंतु चुकून राहिल्यामुळें तीं शेवटीं दिलीं आहेत.

शुद्धिपत्रांत दिल्याप्रमाणें या ग्रंथांतील अशुद्धें अगोदर शुद्ध करून मग ग्रंथ वाचावा अशी सर्वांस विनंति आहे.

हा ग्रंथ सर्वांस सुलभ पडावा ह्मणून किंमत अवघी दहा आणे ठेविली आहे.

ह्या ग्रंथांतील सर्व प्रकारचे दोषांची जबाबदारी ग्रंथ कर्त्याकडे नसून केवळ प्रकाशकाकडे आहे.

प्रकाशक.

रत्नागिरी
तारीख २९ मार्च १८९७.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | १० | ग्राह्य व | ग्राह्य |
| २१ | ५ | परंतु | परंतु |
| २२ | १६ | यागिक | यौगिक |
| २४ | ८ | पुलिंग | पुल्लिंग |
| २६ | १४ | नपुसकलिंगी नामास | नपुंसकलिंगी नामांस |
| ३६ | २१ | गगे | गंगे |
| ३७ | ९ | स्त्रीलिंग | स्त्रीलिंग. |
| ५० | ९ | त्याजहून | त्यांजहून |
| ५७ | १० | उघड | उघड. |
| ६५ | ४ | लां | लां |
| ,, | ६ | लें | लें |
| ७८ | ५ | ागितलें | मागितलें |
| ,, | २२ | आहे | आहें |
| ८८ | ८ | हवा | हवा— |
| ९१ | १६ | दुस या | दुसऱ्या |
| १०० | ८ | शक्ति | भक्ति |
| १११ | १९ | कर्तरी | कर्तरि |
| १२५ | ६ | धानूचीं | धातूचीं |
| १२७ | ११ | बाकीचे | बाकीचे |
| १२९ | १४ | प्रत्ययान्तापुढें | प्रत्ययान्तापुढें |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १३४ | ११ | कियापदांत | क्रियापदांत |
| ,, | ,, | धातुसाधितापासून | धातुसाधितापासून |
| ,, | १३ | लादिसंबंधानें | लादिसंबंधानें |
| १३५ | १८ | असतां | असतां |
| १३९ | २५ | टाकावे | टाकावें |
| १४२ | ७ | प्रस्तुन | प्रस्तुत |
| १४६ | २३ | वांचून | वांचून, |
| १४७ | ८ | प्रतिपदिकाच्या | प्रातिपदिकाच्या |
| ,, | १० | विशेषणाचा | विशेषणाचे |
| १७९ | १९ | हकारांत | हकारान्त |
| १८६ | ८ | दोहोंतून | दोहोंहून |
| १८८ | २२ | शेषशाई | शेषशायी |
| १९३ | १९ | चंद्रमुखा | चंद्रमुखी |
| १९८ | ४ | याजिलीं | योजिलीं |
| २०३ | ७ | इ० | इ०. |
| २०४ | १५ | विधेयमान | विधेयनाम |

# अनुक्रमणिका.

विषय. पृष्ठ.

## वाक्यविचार.

## परिशिष्ट पहिलें.

# मराठी भाषेचें मध्यम व्याकरण.

१ **व्याकरण** हें भाषेच्या नियमांचें शास्त्र होय. व्याकरणांत वर्ण, शब्द आणि वाक्यें ह्यांचीं लक्षणें व त्यांच्या जाति, शब्दांची व्युत्पत्ति, वाक्यरचना इत्यादि विषयांचा विचार केला असतो.

२ व्याकरण शिकल्यानें अमुक शब्द किंवा वाक्य शुद्ध कां व अशुद्ध कां हें समजतें.

**टीप**—कोणत्याही भाषेचे प्रकार अनेक असतात. त्यांत विद्वान् लोकांच्या बोलण्यांत व विशेषेंकरून लिहिण्यांत जो प्रकार आढळतो तो शुद्ध ह्मणजे ग्राह्य व व इतर प्रकार अशुद्ध ह्मणजे अग्राह्य समजतात.

३ वर्णविचार, शब्दविचार आणि वाक्यविचार असे व्याकरणाचे मुख्य तीन भाग आहेत.

## वर्णविचार.

४ कंठ आदिकरून मुखांतील अवयवांपासून निघणाऱ्या व ज्यांचीं चिन्हें ठरविलीं आहेत अशा ध्वनींस **वर्ण** ह्मणतात.

५ हे वर्ण ४९ आहेत. ते येणेंप्रमाणें—

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः, क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ळ्.

ह्यांपैकीं पहिल्या तेरा वर्णांस **स्वर** म्हणतात, १४ ल्याला **अनुस्वार,** १५ व्याला **विसर्ग** आणि बाकीच्या ३४ वर्णांस **व्यंजनें** म्हणतात. ह्यांतील ऋ, ॠ, ऌ, ङ्, आणि ञ् हे वर्ण संस्कृत शब्दांत मात्र आढळतात.

**टीप**—(अ) अनुस्वार आणि विसर्ग यांचा उच्चार स्वराचे साहाय्यावांचून होत नाहीं म्हणजे त्यांचा उच्चार करण्यास कोणता तरी स्वर घ्यावा लागतो, म्हणून ते अ ह्या स्वरास जोडून दाखविण्याची रूढी पडली आहे. कांहीं संस्कृत ग्रंथकारांनीं अनुस्वार व विसर्ग ह्यांची गणना व्यंजनांत केली आहे व कांहींनीं स्वर व व्यंजनें ह्या दोहोंतही त्यांची गणना न करितां ते निराळेच वर्ण मानिले आहेत. व तें करणें रास्तही दिसतें. कारण ते वर्ण नसून स्वराचे विशेष परिणाम आहेत.

(इ) क हें अक्षर होय आणि क् हें व्यंजन होय. ह्यांच्या उच्चारांतील भेद शिक्षकानें स्पष्ट करून दाखवावा.

६ ज्या वर्णाचा उच्चार मुखांतून स्पष्ट निघतो त्यास **स्वर** म्हणतात, आणि ज्याचा उच्चार स्वराच्या उच्चाराच्या मानानें फारच आंखूड होतो त्यास **व्यंजन** म्हणतात.

**टीप**—अनुस्वाराचा उच्चार मराठींत चार प्रकारचा होतो:—

**प्रकार १ ला**—( अनुस्वारापुढें य, र, ल, व, श, ष, स, ह, ळ यांशिवाय व्यंजन असेल तर अनुस्वाराचा उच्चार पुढील व्यंजनाच्या वर्गांतील पांचव्या व्यंजनाप्रमाणें होतो). उ०—चंग, विंचू, तंटा, पंत, बंब, इ०.

**प्रकार २ रा**—( अनुस्वारापुढें य, व, ळ आले असतां अनुस्वाराचा उच्चार पुढील वर्णाप्रमाणें विकल्पें होतो). उ०—संयोग, संलग्न, संवत्सर इ०.

**प्रकार ३ रा**—(अनुस्वारापुढें र, श, ष, स, ह, ज्ञ यांतील एखादा वर्ण येईल तर अनुस्वाराचा उच्चार पूर्व-वर्ण अनुनासिक होऊन व् सारिखा ध्वनित होतो; परंतु तो व् लिहूंनये) उ०—संरक्षण, संशय, संसार, सिंह, संज्ञा, इ०.

**प्रकार ४ था**—(अनुनासिकाप्रमाणें) उ०—दांत, त्यांत, कां इ०. हा प्रकार मात्र संस्कृतांत आढळत नाहीं.

७ स्वरांपैकीं अ, इ, उ, ऋ, ऌ ह्यांस **ऱ्हस्वस्वर** व बाकीच्या स्वरांस **दीर्घस्वर** ह्मणतात.

८ क् पासून म् पर्यंत जीं २५ व्यंजनें ह्यांतील पाचापाचांचे असे पांच वर्ग करून त्यांस अनुक्रमें क् वर्ग, च् वर्ग, ट् वर्ग, त् वर्ग, प् वर्ग असें ह्मणतात. ह्या प्रत्येक वर्गांतील पहिलीं दोन व्यंजनें आणि श्, ष्, स्, ह्या तेरांना **कठोर** आणि बाकीच्या व्यंजनांस **मृदु** ह्मणतात.

## स्थानविचार.

९ मुखाच्या ज्या अवयवापासून मुख्यत्वेंकरून जो वर्ण निघतो त्या अवयवाला त्या वर्णाचें **स्थान** ह्मणतात.

१० तीं स्थानें व त्या स्थानाचे वर्ण खालीं लिहिल्याप्रमाणें:—

( १ ) अ, आ, क्वर्ग, ह् आणि विसर्ग ह्यांचें **कंठस्थान**.

( २ ) इ, ई, च् वर्ग, य् आणि श् ह्यांचें **तालुस्थान.** **तालु** ह्मणजे दंत व मूर्धा ह्यांच्या मधील भाग होय.

( ३ ) उ, ऊ आणि प् वर्ग ह्यांचें **ओष्ठस्थान.**

( ४ ) ऋ, ॠ, ट् वर्ग, र्, ष्, आणि ळ् ह्यांचें **मूर्धस्थान.** **मूर्धा** ह्मणजे तोंडाच्या पोकळींतील टाळूवरचा भाग होय.

( ५ ) ऌ, त् वर्ग, ल् आणि स् ह्यांचें **दंतस्थान.**

( ६ ) ए आणि ऐ ह्यांचें **कंठतालुस्थान.**

( ७ ) ओ आणि औ ह्यांचें **कंठोष्ठस्थान.**

( ८ ) अनुस्वाराचें **नासिकास्थान.**

( ९ ) व् ह्याचें **दंतौष्ठस्थान.**

( १० ) च्, ज्, आणि झ् ह्या वर्णांचा उच्चार मराठींत दंततालव्यही होतो, ह्मणून त्यांचें स्थान दंततालुही आहे. उ०—चांदणी, जागा, झाड इ०.

( ११ ) ङ्, ञ्, ण्, न्, म् ह्यांचीं वर सांगितलेलीं निरनिराळीं स्थानें असून नासिकास्थानही आहे.

११ स्वरास किंवा व्यंजनयुक्त स्वरास **अक्षर** ह्मणावें. जसें—अ, इ, क्+अ=क इत्यादि.

१२ दोन किंवा अधिक व्यंजनांस स्वर जोडला असल्यास त्या वर्णसमुदायास **जोडाक्षर** ह्मणावें. जसें—श्+र्+ई=श्री.

**टीप**—व्यंजनास व्यंजन जोडण्याच्या तीन तऱ्हा आहेत.—

( १ ) एकाखालीं एक लिहून—ट्र, द्व.

( २ ) एकापुढें एक जोडून—ष्य, ज्य.

( ३ ) एका रेघेखालीं जवळ जवळ लिहून—प्र, द्र.

( ४ ) र् ह्यास व्यंजन जोडतांना रेघेवर रेफ काढून जसें—अर्क, सर्प.

१३ व्यंजनास स्वर किंवा स्वरास अनुस्वार अथवा विसर्ग जोडतांना त्याचे जे अवयव बहुधा घेतात ते येणें प्रमाणें:—

### ( १ ) स्वराचे अवयव.

अ ( ा ), आ ( ॥ ), इ ( ि ), ई ( ी ), उ ( ु, ु ), ऊ ( ू ), ऋ ( ृ ), ॠ ( ॄ ), ऌ ( ॢ ), ए ( े ), ऐ ( ै ), ओ ( ो ), औ ( ौ ).

### ( २ ) अनुस्वाराचा.

अं ( ं )

### ( ३ ) विसर्गाचा.

अः ( : )

**टीप**—अनुस्वाराचा अवयव स्वरावर आणि विसर्गाचा अवयव स्वरापुढें जोडितात.

### ( ४ ) व्यंजनाचे.

क् ( क ), ख् ( ख ), ग् ( ग ), घ् ( घ ), ङ् ( ङ ), च् ( च ), छ् ( छ ), ज् ( ज ), झ् ( झ ), ञ् ( ञ ), ट् ( ट ), ठ् ( ठ ), ड् ( ड ), ढ् ( ढ ) ण् ( ण ), त् ( त ), थ् ( थ ), द् ( द ), ध् ( ध ), न् ( न ), प् ( प ), फ् ( फ ), ब् ( ब ), भ् ( भ ), म् ( म ), य् ( य ), र

( ‸, ′, ˚ ), ल् ( ෆ ), व् ( ० ), श् ( २ ), ष् ( ʊ ),
स् ( ९ ), ह् ( ६ ), ळ् ( ω ).

१४ क् ह्या व्यंजनास ऋ, ॠ, ऌ याशिवाय बाकीचे स्वर, व अनुस्वार आणि विसर्ग यांसहित अ जोडून जी बाराखडी होते ती खालीं लिहिल्याप्रमाणें:—

क, का, कि, की, कु, कू, के, कै, को, कौ, कं, कः

## संधि विचार.

१५ शेजारीं शेजारीं आलेल्या दोन वर्णांचें जें ऐक्य त्यास **संधि** असें ह्मणतात. हें ऐक्य चार तऱ्हेनें होतें:—

( १ ) दोन्ही वर्णांबद्दल वेगवेगळाले दोन वर्ण होणें. उ०—जगत्+शासन=जगच्छासन. येथें त् व श् ह्यांच्या जागीं अनुक्रमें च् व छ् हे दोन वर्ण झाले आहेत.

( २ ) दोहोंच्या जागीं एक वेगळा वर्ण होणें. उ०—राम+ईश्वर=रामेश्वर. एथें अ आणि ई ह्यांच्या जागीं ह्यांहून वेगळा ए हा वर्ण झाला आहे.

( ३ ) दोहोंच्या जागीं त्यांपैकींच एक होणें. उ०—नदी+आंतून=नदींतून, एथें+ऊन=एथून. पहिल्या उदाहरणांत ई आणि आ ह्यांबद्दल ई हाच राहिला आहे. व दुसऱ्या उदाहरणांत ए व ऊ ह्यांबद्दल ऊ हाच राहिला आहे.

( ४ ) दोहोंतील एकास मात्र भिन्न वर्ण होणें. उ०—वायु+आवरण=वाय्वावरण. उद्+हार=उद्धार. पहिल्या उदाहरणांत उ या वर्णास व् झाला आहे. व दुसऱ्या उदाहरणांत ह् या वर्णास ध् झाला आहे.

१६ स्वरसंधि, व्यंजनसंधि, आणि विसर्गसंधि असे संधीचे तीन प्रकार आहेत.—

( १ ) स्वरास्वराच्या संधीला **स्वरसंधि** ह्मणतात.

( २ ) व्यंजनाव्यंजनाच्या किंवा व्यंजन आणि स्वर ह्यांच्या संधीला **व्यंजनसंधि** ह्मणतात.

( ३ ) विसर्ग आणि स्वर किंवा व्यंजन ह्यांच्या संधीस **विसर्गसंधि** ह्मणतात.

## स्वर संधि.

**टीप**—मराठी भाषेंत प्रकृतीप्रकृतीचा ( मूळ शब्दांचा ) संधि प्रायः आढळत नाहीं; प्रकृति व प्रत्यय ह्यांचा आढळतो. जसें, कर+आ=करा, ठेव+ऊन=ठेवून, भाव+ऊ=भावो, जाऊ+आ=जावा, नदी+आ=नद्या, एथ+ईल=एथील, कर+ओ=करो. ह्मणून स्वरसंधीचीं उदाहरणें बहुधा संस्कृतांतील घेतलीं आहेत.

१७ स्वर संधीचे नियम एणेंप्रमाणें.—

**नियम १ ला**—ए, ऐ, ओ आणि औ ह्यांखेरीज एकाच स्थानच्या दोन स्वरांचा संधि करावयाचा असतां दोहोंच्या जागीं त्याच स्थानचा दीर्घस्वर होतो. उ०—दैव+अधीन=दैवाधीन; हिम+आलय=हिमालय; विद्या+अर्थी=विद्यार्थी; विद्या+आलय=विद्यालय; हरि+इच्छा=हरीच्छा; कवि+ईश=कवीश; नदी+इच्छा=नदीच्छा; पार्वती+ईश=पार्वतीश; भानु+उदय=भानूदय; सिंधु+ऊर्मि=सिंधूर्मि; वधू+उत्तमा=वधूत्तमा; वधू+ऊर्मिका ( आंगठी )=वधूर्मिका; मातृ+ऋण=मातॄण.

**२ रा**—अ किंवा आ ह्यांपुढें इ किंवा ई, उ किंवा ऊ, ऋ किंवा ॠ, अथवा ऌ हे आले असतां त्या दोहोंच्या जागीं अनुक्रमें ए, ओ, अर् आणि अल् असे आदेश होतात. उदा०—ईश्वर+इच्छा=ईश्वरेच्छा; गण+ईश =गणेश; यथा+इष्ट=यथेष्ट; रमा+ईश=रमेश; औषध+ उपाय=औषधोपाय; जल+ऊर्मि=जलोर्मि; धारा+उष्ण =धारोष्ण; गंगा+ऊर्मि=गंगोर्मि; देव+ऋषि=देवर्षि; महा+ऋत्रि=महर्षि.

**टीप**—ऌचे वहिवाटींतील देण्यासारखें उदाहरण सांपडत नाहीं.

**३ रा**—अ किंवा आ ह्यापुढें ए किंवा ऐ आला असतां त्यांचा संधि ऐ होतो; आणि ओ किंवा औ आला असतां त्यांचा संधि औ होतो. उ०—अत्र+एव=अत्रैव; मत+ऐक्य =मतैक्य; सर्वथा+एव=सर्वथैव; गंगा+ऐश्वर्य=गंगैश्वर्य; जल+ओघ=जलौघ; धर्म+औदार्य=धर्मौदार्य; गंगा+ ओघ=गंगौघ; विद्या+औत्सुक्य=विद्यौत्सुक्य.

**४ था**—इ किंवा ई, उ किंवा ऊ; ऋ किंवा ॠ; व ऌ ह्यांपुढें भिन्नस्थानचे स्वर आले असतां त्यांच्या जागीं अनुक्रमें य्, व्, र्, ल्, हे आदेश होतात. उ०—इति+आदि=इत्यादि; सती+उत्कर्ष=सत्युत्कर्ष; मनु+ अंतर=मन्वंतर; वधू+आनयन=वध्वानयन; मातृ+उद्धार =मात्रुद्धार.

**५ वा**—ए, ऐ, ओ आणि औ ह्यां पुढें कोणताही स्वर असल्यास त्यांच्या जागीं यथाक्रम अय्, आय्, अव्,

आव् हे वर्ण होतात. उ०—शे+अन=शयन; नै+अक=नायक; को+अन=कवन; नौ+इक=नाविक.

**टीप**—ह्या नियमाचीं उदाहरणें प्रकृतीस प्रकृति जोडून होणारीं प्रचारांतील नसल्यामुळें प्रकृति व प्रत्यय ह्यांच्या संधीचीं उदाहरणें दिलीं आहेत.

**६ वा**—कधीं कधीं दोन स्वरांचा संधि होत असतां दोहोंच्या जागीं पहिलाच स्वर होतो ह्यास **पूर्वरूप संधि** ह्मणतात. उ०—कांहीं+असा=कांहींसा; एक+एक=एकक; किती+एक=कितीक.

**७ वा**—कधीं कधीं दोन स्वरांचा संधि होत असतां दोहोंच्या जागीं दुसरा स्वर होतो. त्यास **पररूप संधि** म्हणतात. उ०—एक+ऊन=एकूण (एकूणतीस) एक+एक=एकेक; कर+ओ=करो.

## व्यंजन संधि.

१८ चालू भाषेंत व विशेषें करून कवितेंत व्यंजनांचे जे संधि आढळतात ते संस्कृतांतून आले आहेत. ते एणेंप्रमाणें:—

**१ ला**—क्, द्, त्, प् ह्या चार वर्गांपैकीं अनुनासिक वर्ण (ङ्, ण्, न्, म्) शिवाय करून कोणतेंही व्यंजन शब्दाच्या शेवटीं असून त्या पुढें मृदु वर्ण किंवा शब्दाचा आद्य स्वर आला असतां पहिल्या व्यंजनास त्याचे वर्गांतील तिसरें व्यंजन होतें. उ०—दिक्+गज्=दिग्गज; षट्+आनन=षडानन; सत्+गुण=सद्गुण; अप्+धि=अब्धि.

२ रा– क्, ट्, त्, प् ह्या चार वर्गांपैकीं अनुनासिकाशिवाय कोणतेंही व्यंजन शब्दाच्या शेवटीं असून त्यापुढें श् खेरीज कोणतेंही कठोर व्यंजन आलें असतां पहिल्याचे जागीं त्याच्याच वर्गांतील पहिलें व्यंजन होतें. उ०—वाग्+पति=वाक्पति; षड्+पद=षट्पद; क्षुध्+पीडा=क्षुत्पीडा; अब्+क्षालन=अप्क्षालन.

३ रा—स् किंवा त वर्गांतील व्यंजन ह्यांशीं श् किंवा च वर्गांतील व्यंजन ह्याचा योग आला असतां स् ह्या व्यंजनास श् व त वर्गांतील व्यंजनास च वर्गांतील व्यंजन यथाक्रम होतें. उ०—मनस्+चांचल्य=मनश्चांचल्य; मनस्+शांति=मनश्शांति; शरद्+चंद्र=शरत्+चंद्र (व्यंजन संधि नियम २ पहा)=शरच्चंद्र.

टीप– पण श् ह्या पुढें त वर्गांतील व्यंजन आलें असतां हा नियम लागू नाहीं. उ०– (प्रच्छ्)=प्रश्+न=प्रश्न.

४ था—स् किंवा त वर्गांतील व्यंजन ह्यांशीं ष् किंवा ट वर्गांतील व्यंजन ह्यांचा योग असतां स् ह्या व्यंजनास ष् व त वर्गांतील व्यंजनास ट वर्गांतील व्यंजन यथाक्रम होतें. उ०—सुमनस्+षटक्=सुमनष्षट्क; धनुस्+टंकार =धनुष्टंकार; तत्+टिप्पनी=तट्टिप्पनी.

टीप—त वर्गापुढें ष् आला असतां हा नियम लागू नाहीं. उ०—तत्+षट्क=तत्षट्क.

५ वा— शब्दाच्या शेवटीं पांच वर्गांपैकीं कोणतेंही व्यंजन असून त्यापुढें अनुनासिक व्यंजन आलें असतां

पहिल्या व्यंजनाचे जागीं त्याचेच वर्गातील अनुनासिक व्यंजन विकल्पानें होतें. उ०—जगत् +मान्य=जगन्मान्य किंवा जगद्मान्य ( पहिला नियम पहा ); वाक्+नियमन=वाङ्नियमन.

परंतु पुढील अनुनासिक वर्ण प्रत्ययाचा असल्यास विकल्प नाहीं. उ०—चित्+मात्र=चिन्मात्र,तत्+मय=तन्मय.

**६ वा**—शब्दाच्या शेवटीं अनुनासिक व्यंजनाशिवाय पांचा वर्गांपैकीं कोणतेंही व्यंजन येऊन त्यापुढें श् हें व्यंजन आलें असतां श् ह्या व्यंजनास छ् हें व्यंजन विकल्पें होतें. उ०—उत्+शिष्ट=उच्छिष्ट किंवा उच्शिष्ट ( नियम तिसरा ); तृट्+शांति=तृटछांति किंवा तृट्-शांति ( नियम २ रा पहा ).

**७ वा**—शब्दाच्या शेवटीं अनुनासिक व्यंजनाशिवाय पांचा वर्गांपैकीं कोणतेंही व्यंजन येऊन त्यापुढें ह् हें व्यंजन आल्यास ह् ह्यास मागच्या व्यंजनाच्या वर्गातील चवथें व्यंजन विकल्पानें होतें. उ०—मत्+हरण=मद्धरण किंवा मद्हरण ( नियम १ ला पहा ).

**८ वा**—शब्दाच्या शेवटीं त वर्गातील व्यंजन येऊन त्यापुढें ल् हें व्यंजन आलें असतां त वर्गातील व्यंजनास ल् हें व्यंजन होतें. उ०—तद् +लीन=तल्लीन.

**९ वा**—शब्दाच्या शेवटीं स् असून त्यास कांहीं जोडावयाचें असो अगर नसो त्याचे जागीं विसर्ग होतो. उ०—मनस् + रथ=मनः + रथ; तेजस् + पुंज=तेजःपुंज; तेजस्=तेजः

१० वा—शब्दाच्या शेवटीं र् येऊन त्यास कठोर व्यंजन जोडावयाचें असल्यास किंवा कांहीं जोडावयाचें नसल्यास त्याचे जागीं विसर्ग होतो. उ० -प्रातर् + संध्या=प्रातःसंध्या; पुनर् =पुनः

११ वा—र् पुढें र् किंवा ढ् पुढें ढ् आल्यास त्यांतील पहिल्या र् चा किंवा ढ् चा लोप होतो व त्या लोप झालेल्या र् च्या किंवा ढ् च्या मागें अ, इ किंवा उ असल्यास तो दीर्घ होतो. उ०—निर् + रस = नि + रस=नीरस; रुढ्+ढि=रू + ढि=रूढि; वार् + राशि=वा + राशि=वाराशि.

## विसर्ग संधि.

१९ विसर्गाचा व त्या पुढील वर्णाचा संधि पुढें लिहिल्या प्रमाणें होतो :—

**नियम १ ला**—विसर्गा मागें अ असून पुढें अ किंवा मृदुवर्ण येईल तर विसर्गास उ आदेश होतो. नंतर मागील अ ह्याशीं तो उ मिळून स्वरसंधि नियम २ प्रमाणें संधि होतो. अशा वेळेस पुढें अ असल्यास त्याचा लोप होतो. जसें मनः + रथ=मनउ + रथ=मनोरथ; मनः + अनुरूप=मनउ + अनुरूप=मनो + अनुरूप = मनोनुरूप.

**नियम २ रा**—विसर्गापुढें च्, छ् असल्यास विसर्गास श्; ट्, ठ, असल्यास ष्; त्, थ् असल्यास स् होतो; आणि श्, ष्, स् असल्यास हेच आदेश विकल्पें होतात. जसें—निः + चक्र=निश्चक्र; निः + टंक=निष्टंक; निः + तेज=निस्तेज; निः + शर=निःशर किंवा नि-

श्शार; निः + षट्क=निःषट्क किंवा निष्षट्क; निः + सार=निःसार किंवा निस्सार इ०.

**नियम ३ रा**—विसर्गापुढें क, ख, प, फ ह्यांपैकीं कोणतेंही व्यंजन आल्यास विसर्ग तसाच रहातो. उ०—रजः+कण=रजःकण; अधः+पतन=अधःपतन;

परंतु कांहीं शब्दांत विसर्गाबद्दल स्कार होतो. उ०—तिरः+कार=तिरस्कार; नमः+कार=नमस्कार.

**नियम ४ था**—विसर्ग प्रत्ययांतील नसून त्याच्या-मागें इ, उ हे असतील आणि क्, ख्, प्, फ् यांतील वर्ण पुढें असेल तर विसर्गास ष् होतो. जसें—निः+कलंक=निष्कलंक; दुः+परिणाम=दुष्परिणाम. इ०.

## शब्दविचार.

२० ज्या वर्णापासून किंवा वर्णसमुदायापासून कांहीं अर्थ समजतो त्यास **शब्द** असें ह्मणतात.

२१ कोणत्याही शब्दाचा जो अर्थ होतो तो संकेतानें, रूढीनें किंवा संगतीनें होतो. जसें **व्याकरण** ह्या शब्दाचा अर्थ स्पष्टीकरण असा आहे; परंतु भाषाशास्त्रज्ञांनीं त्या शब्दाचा अर्थ भाषेंतील नियमांचें शास्त्र असा केला आहे. तसेंच **बिंदु, आकृति** इत्यादि शब्दांचे जे रूढीमध्यें अर्थ होतात त्यांहून गणितशास्त्रामध्यें वेगळे ठरविलेले आहेत, ह्मणून व्याकरण, बिंदु, आकृति यांचे अर्थ संकेतानें होतात असें समजावें. **झाड, घर, कागद** इत्यादि शब्दांचे अर्थ रूढीनें घ्यावयाचे आहेत. त्यांचे अर्थ कसे झाले हें सांगण्यास रूढीखेरीज दुसरा

आधार नाहीं. तसेंच ई, ट, टी, ईव यांचे अर्थ स्वतंत्रतेनें कांहीं होत नसून प्रकृतीच्या संगतीनेंच होतात हें पुढील उदाहरणांवरून कळून येईल. उ०—कंठ+ई ( भूषणार्थी ) = कंठी ( कंठातील भूषण ); झाड+ई ( समुदायार्थी )=झाडी ( झाडांचा समुदाय ); खार+ट ( युक्तार्थी )=खारट ( मिठानें युक्त ); दिवा+टी ( कुत्सितअर्थी )=दिवटी ( वाईट किंवा लहान दिवा ); घड+ईव ( भूतकालिक )=घडींव ( घडलेले ).

२२ शब्दांचे प्रकार किंवा जाति वेगवेगळाल्या कारणांनीं वेगवेगळाल्या होतात.

# शब्दांचे भेद.

## प्रकार पहिला.

## सिद्ध किंवा साधित.

२३ ज्या शब्दाला त्याचा विवक्षित ( लौकिकांतील किंवा इष्ट) अर्थ दाखविणारे अवयव नसतात त्यास **सिद्ध शब्द** ह्मणतात. उ०—लांकूड, घोडा, नवसागर इ०.

**नवसागर** हा शब्द कदाचित् नव आणि सागर अशा दोन शब्दांनीं झालेला असावा असें वाटेल; पण त्या शब्दांपासून होणारा अर्थ आणि **नवसागर** ह्या शब्दाचा जो विवक्षित अर्थ हे अगदीं वेगळाले आहेत. ह्मणून येथें **नवसागर** हा शब्द सिद्ध जाणावा. तसेंच (पुण्यांतील) **विश्रामबाग, लकडीपूल** इ० शब्दांविषयीं समजावें.

२४ ज्या शब्दाला त्याचा विवक्षित अर्थ दाखविणारे अवयव असतात त्यास **साधित** शब्द ह्मणतात. उ०—शहाण + पणा ( धर्मबोधकप्रत्यय )=शहाणपणा; चोर + गह्ली=चोरगह्ली.

२५ साधितशब्द दोनप्रकारचे आहेत. प्रकृतीस प्रत्यय जोडून होणारे, जसें, दगड + ई=दगडी, झाडी, इ०; व प्रकृतीस प्रकृति किंवा प्रकृतीस प्रकृति आणि प्रत्यय जोडून होणारे, जसें चक्र + पाणि=चक्रपाणि. लक्ष्य + पूर्व + क=लक्ष्यपूर्वक, इ०.

ह्यांतील पहिल्या प्रकारच्या शब्दास **प्राकृतिक शब्द** ह्मणतात व दुसऱ्यास **सामासिक** म्हणतात.

२६ जो शब्द अमुक शब्दांहून अमुक अर्थी होतो, असें सांगितलें असतें व ज्याची योजना वाक्यांत एकटी होत नाहीं त्याला **प्रत्यय** म्हणावें. उ०—धनवान्, पाटिलकी. इ०. एथें **वान्** हा शब्द धन शब्दाहून युक्त या अर्थी होतो व याची योजना वाक्यांत एकटी होत नाहीं म्हणून **वान्** हा प्रत्यय होय. ह्याचप्रमाणें पाटीलकी ह्यांतील **की** शब्दाविषयीं समजावें.

येथें विभक्तिप्रत्यय व आख्यात (क्रियापदाचे) प्रत्यय ह्यांहून भिन्न प्रत्यय समजावयाचें.

२७ ज्या शब्दाचा अर्थ स्वतंत्रतेनें कळतो व ज्या शब्दाहून अमुक प्रत्यय अमुक अर्थी होतो असें सांगितलें असतें त्याला **प्रकृति** म्हणावें. उ०—धनवान्, पाटिलकी इ०. येथें धन व पाटील ह्या शब्दांहून यथाक्रम

वान् व की हे प्रत्यय युक्त व धंदा या अर्थी होतात असें सांगितलें आहे व ह्या शब्दांचा अर्थ स्वतंत्रतेनें कळतो म्हणून **धन** व **पाटील** ह्या प्रकृति होत.

२८ धातु, प्रत्यय, विभक्त्यंत शब्द व क्रियापदें हीं खेरीज करून जे सार्थ शब्द त्यांस **प्रातिपदिक** म्हणतात.

## प्रकार दुसरा.

## सव्यय आणि अव्यय.

२९ लिंग आणि वचन ह्या दोहोंच्या अथवा त्यांतील एकाच्या संबंधानें ज्या शब्दास विकार होतो त्यास **सव्यय** ह्मणावें. उ०—टोपला, टोपली, टोपलें; टोपले, टोपल्या, टोपलीं; करितों (मी अथवा आम्ही), करतील (ते, त्या, तीं).

३० ज्या शब्दास लिंग आणि वचन ह्यांपैकीं एकाच्याही संबंधानें विकार होत नाहीं त्यास **अव्यय** ह्मणावें. उ०— खालीं, वर, पुढें, लवकर इ०.

**टीप**—आकारांत विशेषणाचा जेव्हां अव्ययाप्रमाणें उपयोग होतो तेव्हां त्यास विशेषणाप्रमाणेंच विकार होतात; उ०—तो **थोडा** चालतो, ती **थोडी** बसते इ०.

३१ सव्ययाचे **नाम**, **सर्वनाम**, **विशेषण** आणि **क्रियापद** असे चार भेद आहेत.

**टीप**—विशेषणास चालू भाषेंत लिंग व वचन ह्यांच्या संबंधानें विकार होत नाहीं व जीं विशेषणें पुल्लिंगी नामास लक्षून योजिलीं असतां आकारांत होतात तीं व कांहीं संख्याविशेषणें यांशिवाय कोणत्याही

विशेषणास सामान्यरूपही होत नाहीं तेव्हां ह्यास सव्यय कसें ह्मणावें अशी शंका आल्यास तिचें उत्तर असें आहे कीं, कवितेंत विशेषणास लिंग व वचन ह्यासंबंधानें विकार होतात व याच शब्दांची नामाप्रमाणें योजना केली असतां ह्यांस चालू भाषेंतही लिंग, वचन ह्यासंबंधानें विकार होतो, हें मनांत आणून ह्यांची सव्ययांत गणना केली आहे. त्याचीं उदाहरणें :—( १ ) **सुशिक्षित** मनुष्यानें किंवा मनुष्यांनीं; ( २ ) **शहाण्या** मुलांनीं किंवा मुलींनीं; ( ३ ) **साता** जणांनीं; ( ४ ) राम न त्यजि तईंच गुरूतें ॥ न त्यजि **स्वसुखकल्पतरूतें**; ( ५ ) भंगी दशार्णपतिच्या **प्रबलाहि** गजा तदीय भीम करी; ( ६ ) सभ्या भला भला विप्र लाजेल तुझ्याचि मानसा **धुवटा**; ( ७ ) **शहाण्यास** मार शब्दाचा.

३२ अव्ययाचे **शब्दयोगी**, **विशेषणात्मक**, **उभयान्वयी** आणि **केवलप्रयोगी** असे चार भेद आहेत.

३३ ज्या शब्दापासून लिंग व संख्या ह्यांनीं युक्त अशा पदार्थाचा ( वस्तु, गुण, क्रिया इत्यादिकांचा ) बोध होतो व ज्याचा अन्वय विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय ह्यांवांचून दुसऱ्या शब्दांशीं बहुधा होत नाहीं त्याला **नाम** ह्मणावें. जसें—मनुष्य, रामा, क्रोध, चांगुलपण, बोलणें इ०.

**टीप**—कित्येक शब्दांचीं प्रथमान्तरूपें व प्रातिपदिकें ह्यांत भिन्नता नसते खरी; तथापि प्रथमेचे वेळेस त्यांचा विभक्तिप्रत्यय लुप्त झाला आहे असें समजावें.

३४ नाममात्राबद्दल किंवा विशेषणमात्राबद्दल ज्याची योजना प्रायः होते व क्वचित् अव्ययाबद्दलही होते व ज्यापासून विशेष जाति, व्यक्ति किंवा गुण ह्यांचा बोध होत नसून ज्याचा अर्थ संबंधानें घ्यावा लागतो आणि ज्यास प्रायः संबोधन नसतें त्या शब्दास **सर्वनाम** ह्मणावें. उ०—मी, तूं, तें, हा, जो, काय, आपण, असें, इ०.

३५ नामानें दर्शविलेल्या वस्तूचा किंवा क्रियेचा गुण जो शब्द दाखवितो किंवा त्या गुणाचा कमजास्तपणा दाखवितो आणि ज्याचा अन्वय दुसऱ्या शब्दाशीं विभक्तिप्रत्यय वगैरे लाविल्याशिवायही करितां येतो त्यास **विशेषण** ह्मणावें. उ०–पांढरा घोडा; येथें घोडा ह्या नामानें दर्शविलेल्या वस्तूचा पांढरेपणा हा गुण **पांढरा** या शब्दानें दाखविला आहे. गोड भाषण बोलतो, एथें भाषण ह्या शब्दानें दर्शविलेल्या क्रियेचा गोडपणा हा गुण **गोड** ह्या शब्दानें दाखविला आहे. मोठा बुद्धिमान् मुलगा, एथें बुद्धिमान् ह्या शब्दानें जो मुलग्याचा गुण दर्शविला आहे त्याचा जास्तपणा **मोठा** या शब्दानें दाखविला आहे. ह्मणून **पांढरा, गोड,** व **मोठा** हीं सारीं विशेषणें होत.

३६ ज्या शब्दापासून क्रियेचा आणि काळ व अर्थ ह्यांपैकीं एकाचा किंवा दोहोंचा बोध होतो त्याला **क्रियापद** ह्मणावें. उ० जातो हा शब्द जाणें ह्या क्रियेचा बोधक असून वर्तमानकाळाचा बोधक आहे. कर, करावें–

येथें करणें ह्या क्रियेचा बोध असून विध्यर्थाचाही बोध होतो. तो जाता तर मी जातों—एथें जाता ह्या शब्दानें जाणें ह्या क्रियेचा, भूतकालाचा व संकेतार्थाचा बोध होतो. ह्मणून **जातो, कर, करावें** आणि **जाता** हीं क्रियापदें होत.

**टीप**—क्रिया शब्दानें वाक्यांतील मुख्य क्रिया विवक्षित आहे ह्मणून हें लक्षण **केलेलें, कर्तव्य** इत्यादि धातुसाधित विशेषणांस लागू होत नाहीं. तसेंच, आहे, असतो इत्यादि क्रियापदांनीं दाखविलेल्या स्थितीचा क्रिया शब्दामध्येंच समावेश होतो; कारण स्थिति ही शास्त्रदृष्ट्या क्रिया होय. हें मनांत आणून स्थिति हा शब्द योजिला नाहीं.

३७ ज्या अव्ययाची योजना नामापुढें किंवा नामाऐवजीं योजिलेल्या शब्दापुढेंच होते, स्वतंत्र होत नाहीं व ज्याच्या योगानें मागील नामाचें सामान्यरूप (विशेष विकार) होतें त्यास **शब्दयोगी अव्यय** म्हणावें. उ०—साठीं हें अव्यय नामास जोडिल्यावांचून योजितां येत नाहीं, जसें—विद्येसाठीं तो झटतो. येथें साठीं हें शब्दयोगी अव्यय जोडिल्यामुळें विद्या ह्या नामाचें सामान्यरूप झालें आहे.

**टीप**—पर्यंत, पावेतों इ० कांहीं अव्ययांमागें नामाचें सामान्यरूप विकल्पानें होतें. च, ही, ना, मात्र, देखील ह्या अव्ययांच्या मागें सामान्यरूप होत नाहीं, व यांची योजना केवलप्रयोगी व उभयान्वयी अव्ययाशिवाय सर्व

प्रकारच्या शब्दांशीं होतें. उ०—फारच गोड बोलतो, तो आहेच.

३८ नाम, विशेषण किंवा क्रिया यांशीं अन्वय पावणारीं अव्ययें व अशा अव्ययांच्या अर्थांची न्यूनाधिकता दाखविणारीं जीं अव्ययें त्यांना **विशेषणात्मक** अव्ययें म्हणावें. उ०—ऐन, भर, थेट, अगदीं, खूप, निवळ, केवळ, अति, फार, अतिशय, इ०. सध्यां आंब्याचा **ऐन** भर आहे, त्याचा डोळा **खूप** लाल झाला आहे, तो **फार** फसला, तो **अति** जलद चालतो. या उदाहरणांत **ऐन, खूप, फार** व **अति** हीं अव्ययें भर, लाल, फसला, आणि जलद ह्यांचा अनुक्रमें गुण किंवा न्यूनाधिक्य दाखवीत आहेत.

३९ जीं अव्ययें दोन वाक्यें अथवा एकाच जातीचे दोन शब्द जोडितात किंवा वेगळे करितात व त्यांतील कार्यकारणभाव, संकेत, न्यूनता किंवा त्यांची एकरूपता दाखवितात त्यांस **उभयान्वयी** अव्ययें म्हणावें. उ०—

( १ ) रामा **व** कृष्णा जातील—एथें दोन शब्द जोडिले आहेत.

( २ ) रामा आला **व** कृष्णा गेला—एथें दोन वाक्यें जोडिलीं आहेत.

( ३ ) तो आज **अथवा** उद्यां जाईल—एथें दोन शब्द वेगळे केले आहेत.

( ४ ) तो येईल **किंवा** ती जाईल—एथें दोन वाक्यें वेगळीं केलीं आहेत.

( ५ ) तो आला **ह्मणून** मी गेलों—कार्यकारण-भाव दाखविला आहे.

( ६ ) तो येईल **तर** मी जाईन—संकेत दाखविला आहे.

( ७ ) रामा वाचतो परंतु चुकतो—न्यूनता दाखविली आहे.

( ८ ) रामा **ह्मणजे** विष्णूचा भाऊ—एकरूपता दाखविली आहे.

( ९ ) एरंडी **ह्मणजे** एरंडाचें बीं—एकरूपता दाखविली आहे.

४० जीं अव्ययें हर्ष, शोक, आश्चर्य, तिरस्कार, अनुमोदन इत्यादि मनोविकार दर्शविणारीं असून ज्यांची योजना अगदीं पृथक् ह्मणजे वाक्याला सोडून असते त्यांस **केवळप्रयोगी** अव्ययें ह्मणावें. उ०—वा:, छि:. अरेरे इ०.

**टीप**—हीं अव्ययें जो अर्थ दाखवितात तो अर्थ दर्शविणारीं वाक्येंही कधीं कधीं त्या अव्ययाबरोबर योजिलीं असतात. उ०—अरेरे! फार वाईट गोष्ट झाली. कधीं कधीं ह्यांचा स्वतंत्रच प्रयोग करितात. उ०—शाबास, हरहर, अँ: इ०.

## प्रकार तिसरा.

### यौगिक, योगरूढ, रूढ, व यौगिकरूढ.

४१ ज्या शब्दाचा अर्थ त्याच्या अवयवापासून उत्पन्न होऊन व्यवहारांत व्यापक असतो त्यास **यौगिक** असें

म्हणतात. उ०—**दगडी** या शब्दाचा अर्थ 'दगडाची केलेली' असा असून तोच अर्थ व्यवहारांत आहे, ह्मणून **दगडी** हा शब्द यौगिक जाणावा.

४२ ज्या शब्दाचा अर्थ त्याच्या अवयवापासून निघून व्यवहारांत संकोचित झालेला असतो त्याला **योगरूढ** ह्मणावें उ०—**श्राद्ध** याचा अर्थ 'श्रद्धायुक्तकर्म' असा असून व्यवहारांत संकोचित आहे ह्मणून **श्राद्ध** हा शब्द योगरूढ समजावा.

४३ ज्या शब्दाचा अर्थ त्याच्या अवयवापासून उत्पन्न न होतां केवळ परंपरागत असतो त्याला **रूढ** असें म्हणावें. उ०- **नवसागर** ह्याचा अर्थ त्याच्या अवयवावरून न होतां केवळ रूढीवरून झाला आहे म्हणून **नवसागर** हा शब्द रूढ जाणावा.

४४ ज्या शब्दाचा एक अर्थ यौगिक व दुसरा रूढ असतो त्यांस **यौगिकरूढ** म्हणावें. उ०- **शुश्रूषा** या शब्दाचा यौगिक अर्थ 'ऐकण्याची इच्छा' असा असून रूढ अर्थ 'सेवा' असाही होतो, म्हणून **शुश्रूषा** हा शब्द यौगिकरूढ समजावा. तसेंच **मंडप** याचा यौगिक अर्थ 'मंड ( पेज ) पिणारा' असा असून रूढ अर्थ 'मांडव' असाही आहे ह्मणून **मंडप** हा यौगिकरूढ शब्द जाणावा.

## नामविचार.

४५ **सामान्यनाम, विशेषनाम** व **भाववाचकनाम** असे नामाचे तीन प्रकार आहेत.

४६ गुणावरून ठेविलेलें जें व्यक्तीचें किंवा व्यक्तींचें नांव त्यास सामान्यनाम ह्मणावें. उ०- मनुष्य, झाड, सैन्य, झाडी, ईश्वर इ०.

४७ गुण मनांत न आणितां केवळ खुणे ऐवजीं ( करितां ) ठेविलेलें जें व्यक्तीचें नांव त्यास **विशेषनाम** ह्मणावें. उ०—रामा, विष्णू, गोदावरी इ०.

४८ व्यक्तीची अपेक्षा न धरितां केवळ गुणाचें जें नांव त्याला **भाववाचक** नाम ह्मणावें. उ०—दया, शान्ति, माणुसकी, चांगुलपणा, लांबी, चिकणाई, ताठा इ०.

## लिंगविचार.

४९ कोणतीही व्यक्ति पुरुष आहे किंवा स्त्री आहे अथवा नपुंसक (दोहोंतून एकही नाहीं) आहे असें त्या व्यक्तीच्या आंगची जी खूण सुचविते त्या खुणेस **लिंग** ह्मणतात. व त्या खुणेनें युक्त अशा पदार्थाचा वाचक जो शब्द त्यास **पुल्लिंग, स्त्रीलिंग,** आणि **नपुंसकलिंग** असें ह्मणतात. हे शब्द नाम, सर्वनाम व विशेषण असे असतात.

**टीप**—लिंग असणें ही गोष्ट सचेतन पदार्थांना मात्र लागू पडतें. प्राणिवाचक नामांनीं दर्शविलेल्या पदार्थांच्या आंगचें पुरुषत्व किंवा स्त्रीत्व त्या नामांपासून समजतें हें योग्यच आहे. ह्यावरून पहातां प्राणिभिन्नपदार्थांचीं वाचक नामें नपुंसकच असावीं; परंतु तसें नियमानें दृष्टीस पडत नाहीं. ह्या करितां तशा ठिकाणीं पुरुषत्व किंवा स्त्रीत्व ह्याचा आरोप केलेला असतो असें समजावें.

वड, चिंच, हिरा, पाच इ० अप्राणिवाचक नामांनीं दर्शविलेले पदार्थ अचेतन असल्यामुळें ह्यांच्या अंगीं पुरुषत्व किंवा स्त्रीत्व संभवत नाहीं, आणि ह्या नामांपासून तर लिंगांचा बोध होतो. ह्मणूनच तीं येथें आरोपित आहेत असें समजावें. त्याचप्रमाणें प्राणिवाचक नामांतही अशा नामांचे लिंग आणि त्यांनीं दर्शविलेले जे प्राणि ह्यांचे लिंग हीं नेहमीं एकच असतात असा नियम नाहीं. उ०—रावू, घूस, मुंगूस इ०. येथें हीं नामें पुलिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग ह्यांचीं क्रमानें बोधक असतां त्यांनीं दर्शविलेल्या प्राण्यांत दोन्ही लिंगांच्या व्यक्ति आढळतात.

९० पदार्थाच्या पुरुषत्वाचा बोध करणाऱ्या नामास **पुल्लिंग** ह्मणावें. उ०—मुलगा, राघू, बोका, बैल, दगड इ०.

९१ पदार्थाच्या स्त्रीत्वाचा बोध करणाऱ्या नामास **स्त्रीलिंग** म्हणावें. उ०—मुलगी, शेळी, भाटी, गाय, लांडोर, माती इ०.

९२ पदार्थाच्या नपुंसकत्वाचा बोध करणाऱ्या नामास **नपुंसकलिंग** म्हणावें. उ०—मनुष्य, जनावर, झाड, दार, इ०.

**टीप**—प्राण्याच्या आंगचें पुरुषत्व किंवा स्त्रीत्व हीं दाखविण्याची विवक्षा नसल्यास त्या प्राण्याचा वाचक शब्द कधीं कधीं नपुंसक योजितात. उ०—पांखरूं, मेंढरूं, गुरूं इ०.

## विभक्तिविचार.

९३ नामाचा नामाशीं किंवा नामाचा क्रियेशीं संबंध दाखविणारे जे प्रत्यय त्यांस **विभक्ति** किंवा **विभक्तिप्रत्यय** म्हणतात. उ०—सापाशीं वैर, पैशानें महाग, पायानें लंगडा इ०. एथें नामाचा नामाशीं संबंध आहे. काठीनें मारणारा किंवा मारितो एथें काठी हें नाम व मारणें ही क्रिया ह्यांचा संबंध आहे.

**टीप**—आख्यात प्रत्यय व प्रातिपदिक प्रत्यय या दोहोंसही विभक्ति ही संज्ञा आहे; तथापि प्रातिपदिक प्रत्ययासच विभक्ति म्हणण्याची रूढि असल्यामुळें तोच अर्थ एथें घेतला आहे.

९४ ते विभक्तिप्रत्यय व त्यांचे प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| **प्रथमा** | ओ, ऊ, ए | आ, ई, ए, ई, एं |
| **तृतीया** | नें, एं, शीं, आं | नीं, ईं, शीं, हीं, आं |
| **चतुर्थी** | स, ला, तें | स, ला, तें, ना |
| **पंचमी** | ऊन, हून | ऊन, हून |
| **षष्ठी** | च ( ञ, ल ) | च ( ञ, ल ) |
| **सप्तमी** | ईं, आं | ईं, आं |
| **संबोधन** | ए | हो, नो |

**टीप**—(अ) द्वितीया व चतुर्थी यांचे प्रत्यय अगदीं सारखे आहेत व द्वितीयेचा अर्थ एकच असून चतुर्थीचे अनेक आहेत; ह्मणून द्वितीया विभक्ति अजी कमी करून

तिचे प्रत्यय व अर्थ चतुर्थीत घातले आहेत. द्वितीया विभक्ति न मानिल्यामुळें तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी आणि सप्तमी ह्यांस द्वितीया, तृतीया इ०. नांवें अनुक्रमें देणें योग्य दिसतें; तथापि तसें केलें असतां फारच घोटाळा होईल ह्मणून परंपरागत रूढीस अनुसरून ज्या ज्या प्रत्ययांचीं जीं जीं नांवें प्रसिद्ध आहेत तींच येथें कायम ठेविलीं आहेत. द्वितीया तेवढी गाळली आहे.

(इ) तृतीयेचा अनेकवचनीं **ई** प्रत्यय क्वचित् एकवचनींहीं आढळतो. उ०—हा मजकूर मी तोंडीं (तोंडानें) सांगितला.

(उ) कवितेंत चतुर्थीच्या **स** प्रत्ययाचीं रूपें कधीं कधीं **सिं, सी, शिं, शीं,** अशीं होतात.

(ऋ) पंचमीचा **ऊन** प्रत्यय फारच थोड्या पुल्लिंगी व नपुसकलिंगी नामास लागतो. उ०—घरून, हातून इ०.

(ऌ) षष्ठीचा **च** हा विभक्ति प्रत्यय न मानण्याचें कारण असें मानितात कीं, सप्तमीचा **ई** प्रत्यय शिवाय-करून बाकीच्या विभक्तिप्रत्ययांपुढें दुसरे प्रत्यय लागत नाहींत; **च** प्रत्ययापुढें लागतात व ते पुढील विशेष्या प्रमाणें लिंगबोधक व वचनबोधक असतात. उ०—(१) गर्व **मनींचा** मनांतचि जिराला, (२) **त्याच्यानें** ही गोष्ट होणार नाहीं. पहिल्या उदाहरणांत **मनींचा** एथें **ई** प्रत्ययापुढें **चा** प्रत्यय व दुसऱ्या उदाहरणांत **त्याच्यानें** एथें **च** प्रत्ययापुढें **आ+या+नें** इतके प्रत्यय लागले आहेत. रामाचा मुलगा, रामाच्या पोथ्या इ०.

तथापि **च** हा विभक्तिप्रत्यय मानण्यास खालीं लिहिल्याप्रमाणें कारणें आहेत. (१) **च** प्रत्ययामागें शब्दाचें सामान्य रूप होणें—घोड्याचा, (२) **च** प्रत्ययांत शब्दाच्या विशेषणाचें सामान्यरूप होणें—चांगल्या घोड्याचा, (३) समासांत **च** प्रत्ययाचा लोप होणें—चोरगल्ली, (४) सविभक्तिकाबद्दल सामान्यरूप योजणें—'पलंगीं बैसवी राणी। माते हातीं आणवि पाणी' किंवा 'दाटी व्योमघटीं सुरां सुख लुटी घेती जटी धूर्जटी' एथें **माते** व **सुरा** ह्यांचा अर्थ मातेच्या व सुरांची असा आहे. (५) **च** विशेषणप्रत्यय ह्मणजे तद्धितप्रत्यय मानिल्यास त्याच्या मागील शब्दाचें सामान्यरूप होतें व इतर तद्धित प्रत्ययांनीं मागील शब्दाचें सामान्यरूप होत नाहीं; तेव्हां **च** प्रत्ययाच्या योगानेंच हें सामान्यरूप होतें असें मानावें लागेल. (६) **च** प्रत्ययांत शब्द सर्वथा विशेषणच असतो असाही नियम नाहीं. उ०—तो **दिवसाचा** निजतो व **रात्रीचा** जागतो. एथें **दिवसाचा** आणि **रात्रीचा** हीं विशेषणें मानिल्यास दिवससंबंधीं किंवा रात्रीसंबंधी असा अर्थ होईल व त्याचा **निजतो, जागतो** ह्यांशीं अन्वय होणार नाहीं. शिवाय षष्ठी विभक्ति मानण्याचा आजपर्यंत प्रघात पडला आहे, म्हणून त्यालाच अनुसरून आम्हीं येथें षष्ठी विभक्ति मानिली आहे.

(**ए**) संबोधनाच्या एकवचनीं शब्दाचे एकवचनीं सामान्यरूप योजितात. जसें—रामा इ०. **ए** हा प्रत्यय स्त्रीलिंगी ईकारांत शब्दास क्वचित् लागतो.—उ० नदे इ०.

## वचन.

९५ विभक्ति प्रत्ययानें किंवा आख्यात प्रत्ययानें दर्शविलेल्या संख्येस **वचन** म्हणतात. तीं वचनें दोन आहेत, **एकवचन** आणि **अनेकवचन.**

९६ ज्या वचनावरून एका व्यक्तीचा बोध होतो, त्याला **एकवचन** आणि एकाहून जास्त व्यक्तींचा बोध होतो त्याला **अनेकवचन** असें म्हणतात.

९७ हीं वचनें कळण्याचे तीन प्रकार आहेत, ते एणेंप्रमाणें:—

(**अ**) विभक्ति प्रत्ययावरून उ०—**रामानें** हें एकवचन, **रामांनीं** हें अनेकवचन होय. येथें **नें** हा विभक्ति प्रत्यय एक व्यक्ति सुचवितो व **नीं** हा विभक्तिप्रत्यय अनेक व्यक्ति सुचवितो. जातो, जातात—येथेंही असेंच समजावें.

(**इ**) विभक्ति प्रत्यय दोन्ही वचनीं समान असतात, तेव्हां त्यांच्या मागें अनुस्वार नसल्यास एकवचन व तो असल्यास अनेकवचन. उ०—वाघास, वाघांस. एथें **स** हा विभक्तिप्रत्यय दोहों ठिकाणीं एकच आहे, परंतु वाघास या ठिकाणीं **स** प्रत्ययामागें अनुस्वार नाहीं, म्हणून वाघ एक आहे असें समजतें व वाघांस एथें **स** प्रत्ययामागें अनुस्वार आहे, त्यावरून वाघ अनेक आहेत असें समजतें.

(**उ**) पूर्वापर संबंधावरून-म्हणजे मागें व पुढें जे शब्द आले असतील त्यांवरून उ०—दहा घरीं, घरून;

एक खांब, दोन खांब, हत्ती आहेत; मी काम करूं, आम्ही काम करूं. या उदाहरणांत **घरीं, घरून, खांब, हत्ती** व **करूं** ह्यांच्या संख्येचा बोध रूपांवरून होत नाहीं, तरि **दहा, एक, दोन, आहेत, मी** व **आम्ही** ह्यांच्याशीं त्यांचा संबंध असल्यामुळें वरील शब्दांनीं दाखविलेल्या पदार्थांची संख्या एक किंवा अनेक आहे हें कळतें.

## सामान्यरूप.

९८ प्रथमेशिवाय विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय, किंवा सारखा, जोगा इत्यादि विशेषणें जोडिलीं असतां जें प्रातिपदिकाचें रूप असतें किंवा होतें त्यास, किंवा असल्या रूपानें युक्त प्रातिपदिकाच्या मागील विशेषणाचें किंवा षष्ठ्यंत शब्दाचें किंवा सर्वनामाचें किंवा अशा सामान्यरूप बनलेल्या विशेषणाच्या विशेषणाचें जें रूप होतें त्यास **सामान्यरूप** ह्मणतात. उदाहरणें—

( अ ) प्रथमेशिवाय विभक्तिप्रत्यय जोडून झालेलें प्रातिपदिकाचें रूप. उ०--**नदीस, मनुष्यास.**

( इ ) शब्दयोगी अव्यय जोडून झालेलें प्रातिपदिकाचें रूप. उ०--**नदी**कडे, **मनुष्या**कडे.

( उ ) सारखा, जोगा इत्यादि विशेषणें जोडून झालेलें प्रातिपदिकाचें रूप. उ०--**त्यां**सारिखा, **शोभण्या**जोगा.

(ऋ) असल्या रूपानें (सामान्यरूपानें) युक्त प्रातिपदिकाच्या मागील विशेषणाचें रूप. उ०--**चांगल्या** गृहस्थानें.

(ऌ) अशा सामान्यरूप बनलेल्या विशेषणाच्या विशेषणाचें रूप. उ०—**भल्या** चांगल्या गृहस्थानें.

(ए) सामान्यरूपानें युक्त प्रातिपदिकाच्या मागील षष्ठ्यंत शब्दाचें रूप. उ०—**गृहस्थाच्या** मुलानें.

(ऐ) सामान्यरूपानें युक्त प्रातिपदिकाच्या मागील सर्वनामाचें रूप. उ०—**त्या** मुलाला.

**टीप**—कवितेंत विभक्त्यंत शब्दाबद्दल केवल सामान्यरूप कधीं कधीं योजितात.

५९ शब्दांतील शेवटल्या वर्णास त्या शब्दाचा **अंत** आणि त्याचे मागील वर्णास **उपांत** ह्मणतात. तसेंच शेवटले अक्षरास **अंत्य** अक्षर आणि त्याचे मागील अक्षरास **उपांत्य** अक्षर ह्मणतात. जसें विनू या शब्दाचा अंत **ऊ** आणि **न्** उपांत समजावा, आणि **नू** हें अंत्य अक्षर आणि **वि** हें उपांत्य अक्षर समजावें.

६० सामान्यरूपाचे प्रत्यय **आ, ई, ए, या** हे होत. नामाच्या अनेकवचनीं सामान्यरूपावर अनुस्वार असतो.

## अकारांत शब्द

### पुल्लिंग.

६१ अकारांत पुल्लिंगी शब्दांच्या प्रथमेच्या एकवचनाचीं व अनेक वचनाचीं रूपें सारखीं ह्मणजे अकारांतच रहातात; तेव्हां त्यांस प्रथमेचे प्रत्यय लागून लुप्त होतात असें समजावें. ह्यांस कवितेंत कधीं कधीं प्रथमेच्या एकवचनीं **ऊ** व **ओ** हे प्रत्यय लागतात,

तृतीयेचे प्रत्यय **एं** व **ई**, पंचमीचा **ऊन** ( कांहीं शब्दास ), सप्तमीचे **ई** व **आं** हे लागतात. सामान्यरूप करण्यास **आ** प्रत्यय लागतो. उ०—**हात** ह्या शब्दाच्या प्रथमेचें एकवचन व अनेकवचन **हात** असेंच होतें. कवितेंत ह्याचीं प्रथमेच्या एकवचनीं रूपें **हातू** व **हातो** अशीं होतात. तृतीयेचीं रूपें **हातें** ( हात + आ + एं ), **हातीं** ( हात + आ + ई ), पंचमीचें **हातून** ( हात + आ + ऊन ), सप्तमीचीं **हातीं** ( हात + आ + ई ), **हातां** ( हात + आ + आं ), संबोधनाचें **हाता** ( हात + आ ), एणेंप्रमाणें रूपें होतात. याप्रमाणें चालणारे शब्द—पाय, कंठ, तट, रंग, कागद, ताईत इत्यादि.

**टीप**—मराठींत स्वरादि प्रत्यय बहुशः पररूपसंधीनें लागतात.

## स्त्रीलिंग.

६२ अकारांत स्त्रीलिंग शब्दांचे प्रकार, सामान्यरूप व प्रथमा विभक्तीचें अनेकवचन ह्यांच्यासंबंधानें, दोन होतातः—

**प्रकार १ ला**—ज्यांचें सामान्यरूप करण्यास एकवचनीं **ए** व अनेकवचनीं **आ** प्रत्यय लागतो व ज्यांना प्रथमेच्या अनेकवचनीं **आ** प्रत्यय लागतो. उ०—काच, काचेला, काचांना, काचा. ह्याचप्रमाणें बाग, वीट, चिंच, तार, धार इ० समजावें.

**प्रकार २ रा**—ज्यांचें सामान्यरूप दोन्ही वचनीं **ई** प्रत्यय लागून होतें व ज्यांस प्रथमेच्या अनेकवचनीं

ई प्रत्यय लागतो; व ज्यांच्या उपांत्यस्थानीं स् असेल त्यांस तो ई प्रत्यय जोडितांना त्या स्ला श् होतो; आणि उपांत्यस्थानीं य् असल्यास त्याचा क्वचित् लोपही करितात. जसें :— केळ—केळीला, केळींना, केळी; तुळस—तुळशीला, तुळशींना, तुळशी. गाय—गायीला गाईला, गायींना, गाईना, गायी, गाई; इ०. ह्याचप्रमाणें भिंत, साल, कातर, दऊत; कूस, भूस, घूस; हयगय, पोय, गाय, सोय, कोय, इत्यादि शब्द चालतात.

**प्रकार ३ रा**—ज्यांचें सामान्यरूप वरील दोन्ही प्रकारांनीं विकल्पानें होतें व ज्यांस वरील प्रथमेचे दोन्ही प्रत्यय विकल्पानें लागतात. जसें—वरात—वरातेला किंवा वरातीला, वरातींना किंवा वरातांना, वराता किंवा वराती, वराती किंवा वराते. याचप्रमाणें चालणारे शब्द—तरवार, परात इ० समजावे.

### नपुंसकलिंग.

६३ अकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप **आ** प्रत्यय लागून होतें, प्रथमेचें अनेकवचन **ए** प्रत्यय लागून होतें, आणि तृतीयादिकांचे स्वरादि प्रत्यय व सामान्यरूपाचा प्रत्यय हे अकारांत पुल्लिंगाप्रमाणेंच लागतात. उ०—घर, घरें, ( तृतीया ए. व. ), घरून, घरीं, घरां, घरा. ह्याचप्रमाणें झाड, फूल, फळ, इत्यादि शब्द जाणावे.

६४ प्रथमेच्या अनेकवचनीं प्रत्यय जोडितांना आणि सामान्यरूप करितांना अकारांत शब्दांच्या उपांत्य

अक्षरांत दीर्घ ई किंवा दीर्घ ऊ असल्यास त्या ईकारास व ऊकारास चार प्रकारचे विकार होतात.—

**प्रकार १ ला**—दोहोंपेक्षां जास्त अक्षरांच्या कित्येक अकारांत शब्दांत दीर्घ ई व ऊ उपांत्य स्थानीं सव्यंजन असल्यास ईकार व ऊकार ह्यांस अकार होणें. उ०—पुल्लिंग—उंदीर, हरीक; स्त्रीलिंग—खारीक, कणीक, तारीख; नपुंसकलिंग—भरीत, कणीस; पुल्लिंग—ढेकूण, कापूस; स्त्रीलिंग—खरूज, बाभूळ; नपुंसकलिंग—कुलूप, लांकूड. ह्यांचीं अनुक्रमें प्रथमेचीं अनेकवचनें व सामान्यरूपें एणेंप्रमाणें—उंदीर—उंदराला; हरीक—हरकाला, खारका—खारकेला; कणका—कणकेला; तारखा—तारखेला; भरतें—भरताला; कणसें—कणसाला; ढेकूण—ढेकणाला; कापूस-कापसाला; खरजा—खरजेला; बाभळी—बाभळीला; कुलपें—कुलपाला; लांकडें—लांकडाला.

**प्रकार २ रा**—कित्येक अकारांत शब्दांत उपांत्य अक्षर केवळ ई किंवा ऊ असल्यास अथवा तें सव्यंजन असल्यास ईकार अथवा ऊकार हे ऱ्हस्व होणें. उ०—पुल्लिंग—चीक, फकीर; स्त्रीलिंग—चीर, विहीर, ईद; नपुंसकलिंग—पीक, जवाहीर; पुल्लिंग—कूड, खजूर, ऊद, ऊर; स्त्रीलिंग—चूक, बंदूक, ऊब; नपुंसकलिंग—सूत, खर्बूज. ह्यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें व सामान्यरूपें एणें प्रमाणें-चीक—चिकाला, फकीर—फकिराला; चिरा—चिरेला; विहिरी—विहिरीला; इदी—इदेला; पिकें—पिकाला; जवा-

हिरें—जवाहिराला; कूड—कुडाला; खजूर—खजुराला; ऊद—उदाला; ऊर—उराला; चुका-चुकेला; बंदुकी—बंदुकीला; ऊब—ऊबेला; सुतें—सुताला; खर्बुजें—खर्बुजाला.

**प्रकार ३ रा**—कित्येक अकारांत शब्दांतील सव्यंजन उपांत्य ईकाराला अथवा ऊकाराला अकार किंवा ऱ्हस्व विकल्पें होणें. उ०—पुल्लिंग—परीट, उडीद; स्त्रीलिंग—कुंभारीण, बटीक; नपुंसकलिंग—काळीज; पुल्लिंग—बुरूड, तांदूळ; स्त्रीलिंग—बाभूळ, नपुंसकलिंग—काटूक, बाटूक; इ०. ह्यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें व सामान्यरूपें एणेंप्रमाणें. परीट—पर ( रि ) टाला; उडीद—उड ( डि ) दाला; कुंभार ( रि ) णी—कुंभार ( रि ) णीला; बट ( टि ) की—बट ( टि ) कीला; काळ ( ळि ) जें—काळ ( ळि ) जाला; बुरूड—बुर ( रु ) डाला; तांदूळ—तांद ( दु ) ळाला; बाभ ( भु ) ळी—बाभ ( भु ) ळीला; काट ( टु ) कें—काट ( टु ) काला; बाट ( टु ) कें—बाट ( टु ) काला.

**प्रकार ४ था**— दोन अक्षरांहून जास्त अक्षरी शब्दांतील उपांत्य अक्षरें हीं केवळ ई किंवा ऊ असलीं तर तीं ऱ्हस्व होणें किंवा ईला य् व ऊला व् होणें. उ०—पुल्लिंग—ताईत, नाईक; स्त्रीलिंग—कवाईत, पंचाईत, बाईल; नपुंसकलिंग—कुईट (एक प्रकारचें गवत); पुल्लिंग—पाऊस, राऊत; स्त्रीलिंग—दऊत; नपुंसकलिंग—कऊल, पाऊल, देऊळ. ह्यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें व

सामान्यरूपें एणेंप्रमाणें—ताईत—ताइ (य) ताला; नाईक—नाइ (य) काला; कवाइ (य) ती—कवाइ (य) तीला; पंचाइ (य) ती—पंचाइ (य) तीला; बाइ (य) ली—बाइ (य) लीला; कुईट—कुइ (य) टाला; पाऊस—पाउ (व) साला; राऊत—राउ (व) ताला; दउ (व) ती—दउ (व) तीला; कउ (व) लें—कउ (व) लाला, पाउ (व) लें—पाउ (व) लाला; दउ (व) ळें—देउ (व) ळाला.

६९ एकाक्षरी अकारांत शब्दांचें सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन करण्यास वेगळे प्रत्यय लागत नाहींत. उ०—ढ (मूर्ख), ब (आई), ग (गर्व), ख (आकाश) इ०.

## आकारांत शब्द—पुल्लिंग.

६६ आकारांत पुल्लिंग शब्दांचे प्रकार दोन होतात.

**प्रकार १ ला**—आकारांत पुल्लिंगी प्रतिष्ठाबोधक किंवा विशेषनामांचें सामान्यरूप व प्रथमेचे अनेक वचन हीं वेगळीं होत नाहींत. उ०—मामा, नाना, तात्या, अण्णा इ०.

**प्रकार २ रा**—ज्या आकारांत पुल्लिंग शब्दांचें सामान्यरूप अंत्य **आ**चा लोप होऊन **या** प्रत्यय लागून होतें व प्रथमेचें अनेकवचन **ए** प्रत्यय लागून होतें. उ०—आंबा,—आंब्या, आंबे; गेंडा—गेंड्या, गेंडे. परंतु

(अ) ज्यांचा उपांत्य वर्ण फक्त **'य्'** आहे अशांचें सामान्यरूप वेगळें होत नाहीं व प्रथमेचें अनेकवचन **ए** प्रत्यय लागून होतें; परंतु त्या उपांत्यामागें जर **यू** शि-

वाय व्यंजन जोडिलेलें असेल तर त्या य्‌चा बहुधा लोप होतो. (**शिष्या** शब्दाचें मात्र अनेकवचन शिष्ये आणि सामान्यरूप शिष्या असेंच होतें). जसें—पाया-पाये; भाट्या-भाटे; तांब्या-तांबे; भामट्या-भामटे; भय्या-भय्ये; अय्या-अय्ये. इ०.

(इ) ज्यांच्या उपांत्य स्थानीं दंततालव्य व्यंजन आहे त्यांचें सामान्यरूप होतांना उपांत्य स्थानच्या व्यंजनाचा **तालव्य** उच्चार होतो. उ०—चमचा, पंजा, आजा, माचा, खुजा, भाचा, इ०.

(**उ**) ज्यांच्या उपांत्यस्थानीं **स्**कार आहे त्यांचें सामान्यरूप होतांना **स्**कारास **श्**कार होतो. उ०—मासा, विसा, पैसा, ससा इ०

## स्त्रीलिंग.

६७ आकारांत स्त्रीलिंग शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप **ए** प्रत्यय लागून होतें; परंतु तो शब्द मनुष्य व्यक्तीचा वाचक असल्यास त्याचें सामान्यरूप **ए** किंवा **आ** लागून होतें, आणि प्रथमेचें अनेकवचन वेगळें होत नाहीं. उ०—पागा, जागा, टीका, सेवा ह्यांचीं सामान्यरूपें पागे, जागे, टीके, सेवे अशीं होतात व प्रथमेचें अनेकवचन पागा, जागा, टीका, सेवा अशींच होतात. आणि गंगा, रमा ह्यांचीं सामान्यरूपें गंगे, रमे किंवा गंगा, रमा अशीं दोन्ही होतात.

६८ आकारांत, ऐकारांत व औकारांत नपुंसकलिंगी,

एकारांत, ऐकारांत व औकारांत पुल्लिंगी, आणि ऐकारांत व औकारांत स्त्रीलिंगी शब्द मराठींत आढळत नाहींत.

## इकारांत व उकारांत शब्द.

### पुल्लिंग व स्त्रीलिंग.

६९ ऱ्हस्व इकारांत व उकारांत शब्दांचें सामान्यरूप ई व ऊ प्रत्यय अनुक्रमें लागून होतें, आणि प्रथमेचें अनेकवचन एकवचनाप्रमाणेंच असतें. उ०—अग्नि, रवि, कवि, वायु, मेरु, ऋतु, शिशु इत्यादि पुल्लिंग; दृष्टि, रीति, प्रीति, धेनु, तनु इत्यादि स्त्रीलिंग ह्यांचीं सामान्यरूपें अग्नी, रवी, कवी, वायू, मेरू, ऋतू, शिशू, दृष्टी, रीती, प्रीती, धेनू, तनू अशीं होतात.

**टीप**—जे ऱ्हस्व इकारांत व उकारांत संस्कृत शब्द मराठींत आले आहेत ते मात्र ऱ्हस्वांत मानिले आहेत, ह्मणून वरील नियम तसल्या शब्दांसच लागू आहे. असे शब्द नपुंसकलिंगीं प्रायः आढळत नाहींत.

## ईकारांत शब्द.

### पुल्लिंग.

७० ईकारांत पुल्लिंग शब्द दोन प्रकारचे आहेत.

**प्रकार १ ला**—ज्या ईकारांत शब्दांचें सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन हीं वेगळीं होत नाहींत. उ०—हत्ती—हत्ती, पंतोजी—पंतोजी, जती—जती, वादी—वादी. इ०.

**प्रकार २ रा**—ज्या ईकारांत शब्दांचें सामान्यरूप आ प्रत्यय स्वरसांधि नियम ४ प्रमाणें लागून होतें व

प्रथमेचें एकवचन व अनेकवचन हीं सारखींच असतात. उ०—माळी, तांबोळी, गोसावी इत्यादिकांचीं सामान्यरूपें माळ्या, तांबोळ्या, गोसाव्या अशीं होतात. परंतु ज्यांचा उपांत्यवर्ण **स्** किंवा **श्** असतो त्यांचें सामान्यरूप **आ** प्रत्यय लागून होतें आणि उपांत्य सकारास शकार होतो व प्रथमेचें अनेकवचन वेगळें होत नाहीं. उ०—प्रवासी, मिजासी, परदेशी, पारशी, घडशी, मोकाशी इत्यादि. ह्यांचीं सामान्यरूपें प्रवाशा, मिजाशा, परदेशा, पारशा, घडशा, मोकाशा इत्यादि होतात.

## स्त्रीलिंग.

७१ ईकारांत स्त्रीलिंग शब्दांचे तीन प्रकार आहेत—

**प्रकार १ ला**—ज्या ईकारांत शब्दांचें सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन हीं वेगळीं होत नाहींत. उ०—देवी, नारी, दासी, पार्वती इ० संस्कृत शब्द; आणि काकी, मामी, भाई, बाई, आई, ताई इत्यादि मराठी शब्द.

**प्रकार २ रा**—ज्या ईकारांत स्त्रीलिंग शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप वेगळें होत नाहीं व प्रथमेचें अनेकवचन व एकवचनीं सामान्यरूप स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **आ** प्रत्यय लागून होतें, आणि संबोधनाचें एकवचनीं रूप **ए** प्रत्यय लागून विकल्पें होतें. उ०—नदी-नद्या; कुत्री-कुत्र्या; मांजरी-मांजऱ्या, पाटी-पाट्या इत्यादि; व एकवचनीं संबोधनाचीं रूपें हे नदे किंवा नदी, हे कुत्रे किंवा कुत्री, हे मांजरे किंवा मांजरी इत्यादि होतात.

परंतु ज्यांच्या उपांत्यस्थानीं **श्** असतो त्याचें प्रथमेचें अनेकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप हीं **आ** प्रत्यय लागून होतात. उ०—माशी, उशी, वशी, मिशी, ठुशी ह्यांचें प्रथमेचें एकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप माशा, उशा, वशा, ठुशा, मिशा अशीं होतात.

**प्रकार ३ रा—स्त्री, बी** इत्यादि एकाक्षरी स्त्रीलिंग शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप मूळशब्दाप्रमाणेंच राहतें, किंवा अंत्य स्वराचे जागीं **इय्** करून व **ए** प्रत्यय जोडून होतें, आणि प्रथमेचें अनेकवचन व एकवचनीं सामान्यरूप अंत्याचे जागीं **इय्** करून व **आ** प्रत्यय जोडून होतें. उ०—स्त्री, स्त्रीला अथवा स्त्रियेला, स्त्रिया, स्त्रियांना; बी—बीला अथवा बियेला, बिया, बियांना इ०.

## नपुंसकलिंग.

७२ इकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून होतें, व यांचें प्रथमेचें अनेकवचन बहुधा आढळत नाहीं. उ०—पाणी, लोणी, दहीं इ०. ह्यांचें सामान्यरूप पाण्या, लोण्या, दह्या असें होतें. परंतु ( अ ) **मोतीं** ह्या शब्दाचें प्रथमेचें अनेकवचन स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **एं** प्रत्यय लागून विकल्पें होतें. उ०—मोत्यें किंवा मोतें ( इ ) **बीं** शब्दाचें सामान्यरूप अंत्याचे जागीं **इय्** करून व **आ** प्रत्यय जोडून होतें व प्रथमेचें अनेकवचन **एं** प्रत्यय लागून होतें. जसें बीं-बिया-बियें.

## ऊकारांतशब्द.

### पुल्लिंग.

७३ ऊकारांत पुल्लिंग शब्दांच्या प्रथमेचीं एकवचनें व अनेकवचनें सारखींच होतात. यांच्या सामान्यरूपां-वरून त्यांचें पांच प्रकार होतात, व त्यांचें सामान्यरूपहि पांच प्रकारांनीं होतें.

**सामान्यरूपाचे प्रकार**—( अ ) मूळरूपाप्रमाणें, ( इ ) स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून, ( उ ) अंत्यास **ओ** आदेश करून व स्वरसंधि नियम ९ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून, ( ऋ ) **आ** प्रत्यय वि-कल्पें जोडून, ( ऌ ) अंत्यास **उव्** आदेश करून व **आ** प्रत्यय जोडून होतात. ह्मणून ऊकारांत पुल्लिंग शब्दांचे प्रकार पांच आहेत.

**प्रकार १ ला**—गडू, खडू, दांडू, इत्यादिकांचें सा-मान्यरूप **अ** प्रकारचें होतें.

**प्रकार २ रा**-गहूं, भाऊ, इत्यादिकांचें सामान्यरूप इ प्रकाराप्रमाणें होतें. जसें—गहूं, गव्हां इ०.

**प्रकार ३ रा**—लाडू, विंचू, नातू, नारू, इत्यादि-कांचें सामान्यरूप **अ, इ, उ** प्रकाराप्रमाणें विकल्पें होतें. जसें—लाडू-लाड्वा, लाडवा इ०.

**प्रकार ४ था**—परभू, तट्टू, इत्यादिकांचें सामान्यरूप **अ** किंवा **ऋ** प्रकाराप्रमाणें होतें. जसें, परभू किंवा परभा इ०.

**प्रकार ५ वा**-पू, रू इत्यादिकांचें सामान्यरूप **ऌ** प्रकाराप्रमाणें होतें. जसें,-पुवा, रुवा इ०.

26333

**टीप**—गहू शब्दाची प्रथमा असतां अंत्यावर अनुस्वार असतो.

## स्त्रीलिंग.

७४ ऊकारांत स्त्रीलिंग शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन ह्यांच्या संबंधानें मुख्य चार प्रकार होतात.

**प्रकार १ ला**—ज्या ऊकारांत स्त्रीलिंग शब्दांचें सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन हीं वेगळीं होत नाहींत. जसें अफू, अब्रू, काकू, वेणू, दयाळू इ०.

**टीप**—दयाळू यासारखीं विशेषणें ह्या वर्गांत मोडतात, परंतु ह्यांचे एकवचनीं संबोधनीं रूप पुल्लिंगी दयाळो व स्त्रीलिंगी दयाळे असें क्वचित् दृष्टीस पडतें.

**प्रकार २ रा**—ज्या ऊकारांत स्त्रीलिंग शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप—( **अ** ) मूळरूपाप्रमाणें होतें, किंवा ( **इ** ) अंत्याचे जागीं **ओ** करून स्वरसंधि नियम ९ प्रमाणें **ए** प्रत्यय लावून होतें; किंवा ( **उ** ) स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **ए** प्रत्यय लावून होतें; व प्रथमेचें एकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप अंत्याचे जागीं विकल्पें **ओ** करून व **आ** प्रत्यय जोडून होतें. उ०—जळू, सासू इत्यादिकांचीं एकवचनीं सामान्यरूपें जळू किंवा जळवे-जळ्वे, सासू किंवा सासवे-सास्वे अशीं होतात व प्रथमेचीं अनेकवचनीं रूपें व अनेकवचनीं सामान्यरूपें जळवां, जळ्वां; सासवां किंवा सास्वां अशीं होतात.

**प्रकार ३ रा**—ज्या शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप

मूळरूपाप्रमाणें किंवा स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **ए** प्रत्यय जोडून होतें, आणि प्रथमेचें अनेकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप मूळरूपाप्रमाणें किंवा स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून होतें. जसें—एकवचनीं सामान्यरूप—जाऊ किंवा जावे; आणि प्रथमेचें अनेकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप—जाऊ किंवा जावा इत्यादि.

**प्रकार ४ था**—ज्या शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप प्रकार २ प्रमाणें होतें. आणि प्रथमेचें अनेकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप (**अ**) मूळरूपाप्रमाणें किंवा (**इ**) अंत्याचें जागीं विकल्पें **ओ** करून व **आ** प्रत्यय जोडून होतें. जसें-एकवचनीं सामान्यरूपें—बाजू बाजवे—बाज्वे; टाळू—टाळवे—टाळवे अशीं होतात, व प्रथमेचीं अनेकवचनीं रूपें व अनेकवचनीं सामान्यरूपें बाजू—बाजवा—बाज्वा, टाळू—टाळवा—टाळवा अशीं होतात.

७५ **ऊ** व **पिसू** हे शब्द खालीं लिहिल्याप्रमाणें चालतात.

प्रथमेचें एकवचन—ऊ; पिसू, पीस

" अनेकवचन – उवा; पिस्वा, पिसवा, पिसा.

एकवचनीं सामान्यरूप—ऊ किंवा उवे, पिसू, पिसे, पिस्वे, पिसवे.

अनेकवचनीं " —उवा; पिस्वा, पिसा, पिसवा-

**नपुंसकलिंग.**

७६ ऊकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप

व प्रथमेचें अनेकवचन ह्यांच्यासंबंधानें तीन प्रकार होतात.

**प्रकार १ ला**—ज्या ऊकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप ( अ ) मूळरूपाप्रमाणें होतें किंवा ( इ ) स्वरसंधि नियम ४ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून होतें, किंवा ( उ ) अंत्याचे जागीं **ओ** करून स्वरसंधि नियम ६ प्रमाणें **आ** प्रत्यय जोडून होतें, आणि प्रथमेचें अनेकवचन अंत्याचे जागीं विकल्पें **ओ** करून व **एं** प्रत्यय जोडून होतें. उ०—तारूं, असूं, गळूं, अळूं इ०. ह्यांचीं सामान्यरूपें तारू, तार्वा किंवा तारवा अशीं होतात, आणि प्रथमेचीं अनेकवचनें तार्वें किंवा तारवें अशीं होतात.

**प्रकार २ रा**—ज्या ऊकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप मूळरूपाप्रमाणें किंवा **आ** प्रत्यय लागून होतें आणि प्रथमेचें अनेकवचन मूळरूपाप्रमाणें किंवा **एं** प्रत्यय लागून होतें. उ०—जिवाणूं, सुकाणूं इ०. ह्यांचीं सामान्यरूपें जिवाणा किंवा जिवाणू, आणि प्रथमेचीं अनेकवचनें जिवाणूं किंवा जिवाणें अशीं होतात.

**प्रकार ३ रा**—ज्या ऊकारांत नपुंसकलिंग शब्दांचें सामान्यरूप **आ** प्रत्यय लागून होतें व प्रथमेचें अनेकवचन **एं** प्रत्यय लागून होतें. उ०—मेंढरूं, लेंकरूं, लिंबूं इ० ह्यांचीं सामान्यरूपें मेंढरा, लेंकरा, लिंबा इ० होतात, आणि प्रथमेचीं अनेकवचनें मेंढरें लेंकरें इत्यादि होतात.

७७ **अवाळू** शब्द खालीं लिहिल्याप्रमाणें चालतो.

प्रथमेचें एकवचन——अवाळू

,, अनेकवचन—अवाळें

सामान्यरूप ——अवाळा

## एकारांत शब्द.

### नपुंसकलिंग.

७८ एकारांत नपुंसकलिंग शब्दांस प्रथमेच्या अनेकवचनीं **ई** प्रत्यय लागतो व सामान्यरूपीं अंत्याचे जागीं **या** प्रत्यय होतो. उ०—भांडें-भांडीं-भांड्यास. ह्याचप्रमाणें कुत्रें, केळें, घोसाळें, बोलणें इत्यादि शब्द जाणावे. परंतु ज्यांच्या उपांतीं **स्** आहे त्यांच्या अंत्याचे जागीं **या** प्रत्यय न होतां **आ** प्रत्यय होऊन **स्**ला **श्**कार होतो. उ०—कांसें-कांशास. ह्याचप्रमाणें उसें, पडसें, हसें, शिसें इ० जाणावे.

७९ **आत** व **सवय** ह्या शब्दांचीं प्रथमेचीं रूपें कोणी आते, सवे अशीं करितात. **खय--खई, गय--गई, जिल्हय--जिल्हई, तिवय-- तिवई,** इत्यादि शब्द अस्पष्ट उच्चारामुळें खै, गै, जिल्है, तिवै असे ऐकारांत आहेतसे वाटतात; परंतु ह्या शब्दांच्या इतर रूपांवरून हे शब्द अकारांत किंवा ईकारांत आहेत असें दिसतें. त्याचप्रमाणें **पव, नऊ** इत्यादि शब्दांच्या प्रथमेचीं रूपें अस्पष्ट उच्चारामुळें पौ, नौ अशीं वाटतात, तथापि ह्यांना ही वरील गोष्ट लागू आहे ह्मणजे ते अकारांत आहेत असें समजावें.

## ओकारांत शब्द.

### पुल्लिंग.

८० ओकारांत पुल्लिंग शब्दांचीं सामान्यरूपें व प्रथमेचीं अनेकवचनें वेगळीं होत नाहींत. उ०—टाहो, लाहो, डोहो, पोहो इत्यादि.

### स्त्रीलिंग.

८१ ओकारांत स्त्रीलिंग शब्द **बायको** या शब्दाशिवाय विशेष प्रचारांत नाहींत. ह्याचें एकवचनीं सामान्यरूप वेगळें होत नाहीं, आणि प्रथमेचें अनेकवचन व अनेकवचनीं सामान्यरूप **आ** प्रत्यय लागून होतें. जसें—बायको—बायकोला, बायका—बायकांचा.

### नपुंसकलिंग.

८२ ओकारांत नपुंसकलिंग शब्द **मोहों** शिवाय करून प्रचारांत नाहींत; ह्याचें सामान्यरूप व प्रथमेचें अनेकवचन हीं वेगळीं होत नाहींत. जसें—मोहोस—मोहो इ०.

## सर्वनामविचार.

८३ **गाय, रामा** इत्यादि नामांपासून कांहीं एका जातीच्या पदार्थांचा किंवा विशेष व्यक्तीचा जसा प्रत्यक्ष रीतीनें बोध होतो, व **तांबडा, शहाणा** इत्यादि विशेषणांपासून विशेष गुणांचा जसा नियमानें बोध होतो, तसा सर्वनामांपासून होत नाहीं, तर त्यांपासून केवळ संबंधानुसार कोणत्याही जातीचा, व्यक्तीचा किंवा गुणाचा बोध होतो.

८४ सर्वनामांचे मुख्य प्रकार दोन आहेत, **पुरुष-वाचक** सर्वनामें आणि **दर्शक** सर्वनामें.

८५ प्रत्येक व्यक्तीला **पुरुष** ह्मणतात, व ते पुरुष तीन आहेत; **प्रथम, द्वितीय** व **तृतीय**.

८६ जो स्वतां बोलतो तो **प्रथम** पुरुष, ज्याशीं बोलावयाचें तो **द्वितीय** पुरुष आणि ज्याविषयीं बोला-वयाचें तो **तृतीय** पुरुष असें ह्मणतात.

८७ जीं सर्वनामें नामाऐवजीं योजिलीं असतात त्यांना **पुरुषवाचक** आणि जीं विशेषणाऐवजीं योजिलीं असतात त्यांना **दर्शक** सर्वनामें म्हणावें. जसें—मी ये-ईन, तूं येशील, तो येईल—एथें **मी, तूं, तो** हीं पुरुषवा-चक सर्वनामें समजावीं. **मी** ब्राह्मण स्नानसंध्येंत काळ घालवितो, **तूं** शिपाई तरवार गाजवितोस, **तो** मुलगा लिहीत आहे. एथें **मी, तूं** व **तो** हीं दर्शक सर्वनामें जाणावीं. कोणी ह्मणतात कीं दिवसेंदिवस प्रजा अशक्त होत चालली आहे,--एथें **कोणी** हें पुरुषवाचक सर्वनाम आहे. कोणी मनुष्य येऊन पिशवी घेऊन गेला, एथें **कोणी** हें दर्शकसर्वनाम होय.

**टीप—मी** व **तूं** हीं दर्शक सर्वनामें असतांही क्रिया-पद अनुक्रमें प्रथमपुरुषीं व द्वितीयपुरुषीं रहातें.

८८ पुरुषवाचक किंवा दर्शक सर्वनामांपैकीं कित्ये-कांना **संबंधी, प्रश्नार्थक** आणि **सामान्य** अशींही नांवें आहेत.

८९ जीं सर्वनामें पुरुषवाचक किंवा दर्शक सर्वना-

मांशीं संबंध ठेवून योजिलीं असतात त्यांना **संबंधी** सर्वनामें ह्मणतात.

९० ज्या सर्वनामांच्या योगानें प्रश्न विचारितां येतो त्यांना **प्रश्नार्थक** सर्वनामें ह्मणतात.

९१ ज्या सर्वनामांची योजना सामान्यत्वेंकरून ह्मणजे प्रसंग पडेल तशी होते त्यांना **सामान्य** सर्वनामें ह्मणतात.

९२ **पुरुषवाचक** किंवा **दर्शक** सर्वनामें एणेंप्रमाणें— मीं, तूं ; **अ**—( हा, अमुक, अमका, असा, असला, असलाला, इतका, इतुका, इतकाला, एवढा, एवढाला ); **त**—( तो, तसा, तैसा, तमुक, तमका, तसला, तसलाला, तितका, तितकाला, तेवढा, तेवढाला ); **ज**—( जो, जसा, जैसा, जसला, जसलाला, जितका, जितुका, जितकाला, जेवढा, जेवढाला ); **क**—( कोण, कवण, कोणता, कोणी, कोण्ही, कोणीएक, काय, कांहीं, कांहींएक, कांहींक, कसा, कैसा, कसला, कसलाला, कितका, कितकाला, केवढा, केवढाला, किती, कितीएक, कित्येक, कैक, कितीक ); आपण, आपआपण, स्वतः, स्वतां, उभयतः, उभयतां, परस्पर, अन्योन्य, एक, एकएक, एकेक, एकक, एकमेक, भलता.

**टीप**-- **अ, त ज, क** हीं अनेक सर्व नामांचीं मूळ रूपें असून त्यांपासून साधलेलीं त्यांपुढें कंसांत दिलेलीं समजावीं. ह्यांपैकीं आकारांत शब्दांचीं आणि **तो व जो** यांची स्त्रीलिंगीं व नपुंसकलिंगीं रूपें अनुक्रमें ईकारांत व एंकारांत होतात. उ०-हा, ही, हें इ०.

९३ **ज** पासून निघालेल्या सर्वनामांस **संबंधी**, आणि **क** पासून निघालेल्या सर्वनामांस **प्रश्नार्थक** असें ह्मणतात. अमुक, तमुक, अमका, तमका, कैक, कांहींएक, कांहींक, कोणी, कोणीएक, एक, अन्योन्य, परस्पर, एकमेक, आपण, आपआपण, स्वतः, स्वतां, उभयतः, उभयतां व भलता हीं **सामान्य** सर्वनामें होत.

९४ सर्वनामांचीं विभक्त्यंत रूपें.

**मी**

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | मी | आह्मी |
| तृ० | मीं, मजशीं, मशीं, म्यां माझ्यानें माझ्याशीं | आमच्यानें, आमच्याशीं आह्मीं, आह्मांशीं |
| च० | मला, मजला, माला मातें मस | आह्मांला--स, अमुतें आह्मांशीं |
| | एकवचन | अनेकवचन |
| पं० | मजहून, माझ्याहून | आह्मांहून, आमच्याहून |
| ष० | माझा--झी--झें माझे--झ्या--झीं | आमचा-ची-चें, आमचे-च्या-चीं आमुचा-ची--चें, आमुचे-च्या-चीं |

**टीप**— मशीं, म्यां, अमुतें, आमुचा-ची-चें, आमुचे-च्या-चीं, हीं रूपें कवितेंत बहुधा योजितात. मस, माला हीं रूपें प्रौढ भाषणांत येत नाहींत. **आमच्यानें हें** रूप शक्ति दाखवावयाची असतां योजण्याचा परिपाठ आहे. ह्या सारखीं इतर सर्वनामांचीं रूपें अशींच समजावीं. सर्वनामांस सप्तमीचे प्रत्यय बहुधा लागत नाहींत.

## तूं

| | एक वचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्र० | तूं | तुह्मी |
| तृ० | तूं, त्वां, तुवां, तुजशीं तुझ्याशीं, तुशीं | तुह्मीं, तुह्मांशीं तुमच्यानें, तुमच्याशीं |
| च० | तुला, तुजला, तूतें तुतें, तूस | तुह्मांला, तुह्मांस, तुह्मांतें |
| पं० | तुजहून, तुझ्याहून | तुह्मांहून, तुमच्याहून |
| ष० | तुझा-झी-झें तुझे-झ्या-झीं | तुमचा-ची-चें तुमचे-च्या-चीं |

**टीप**—त्वां, तुवां, तूंतें हीं रूपें कवितेंत आढळतात.

## तो

| | | |
|---|---|---|
| प्र० | तो | ते |
| तृ० | त्यानें, तयानें, तेणें त्याच्यानें-शीं, त्याशीं तयाशीं, त्याजशीं | त्यांनीं, त्यांहीं, तिहीं, त्यांशीं त्यांजशीं, तयांशीं, त्यांच्यांशीं, त्यांच्यानें |
| च० | त्याला, त्याजला, त्यास तयास, तयातें, त्यातें | त्यांना, त्यांला, त्यांजला त्यांस, तयांस, तयांतें, त्यांनें, तयांना. |
| पं० | त्याहून, तयाहून त्याजहून, त्याच्याहून | त्यांहून, तयांहून त्यांजहून, त्यांच्याहून |
| ष० | त्याचा, तयाचा इ०. | त्यांचा, तयांचा इ०. |

**टीप**—तयानें, तेणें, तयाशीं, तयास-ला-तें इ० रूपें कवितेंत येतात.

## ती

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | ती, ते | त्या |
| तृ० | तिनें तियेनें, तिणें, तिच्याशीं तिच्यानें, तयेनें, तयेशीं तिशीं, तियेशीं, तिजशीं | त्यांनीं, त्यांहीं, त्यांशीं, त्यांजशीं, तयांशीं, त्यांच्याशीं, त्यांच्यानें |
| च० | तिला, तिजला, तीस, तीतें तियेस-ला-तें, तयेस-ला-तें | त्यांना-ला, त्यांजला, त्यांस तयास-ला-तें, तयांना |
| पं० | तिहून, तिजहून, तियेहून तिच्याहून, तीहून, तयेहून | त्यांहून, त्याजहून त्यांच्याहून, तयांहून |
| ष० | तिचा, तियेचा, तयेचा इ० | त्यांचा, तयांचा इ० |

**टीप**—ते, तियेनें, तयेनें, तियेस, तयेस इ० रूपें कवितेंत आढळतात.

## तें

| | | |
|---|---|---|
| प्र० | तें | तीं |

इतर विभक्तींचीं रूपें पुल्लिंगाप्रमाणें समजावीं.

**टीप**—**जो, जी, जें** हीं सर्वनामें **तो, ती, तें** या सर्वनामांप्रमाणें सर्वांशीं अनुक्रमें चालतात.

## हा

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | हा | हे |
| तृ० | ह्यानें, यानें, ह्याशीं, याशीं, एणें, ह्याच्याशीं, याच्याशीं, ह्याजशीं, याजशीं, ह्याच्यानें, याच्यानें | ह्यांनीं, यांनीं, ह्यांशीं, यांशीं, इहीं, यांहीं, ह्यांच्याशीं यांच्याशीं, ह्यांजशीं, यांजशीं, ह्यांच्यानें, यांच्यानें |

| | | |
|---|---|---|
| च० | ह्याला, याला, ह्याजला याजला, ह्यास, यास | ह्यांला, यांला, ह्यांजला, यांस यांजला, ह्यांस, ह्यांना, यांना |
| पं० | ह्याहून, याहून, ह्याजहून याजहून, ह्याच्याहून, याच्याहून | ह्यांहून, यांहून, ह्यांजहून यांजहून, ह्यांच्याहून, यांच्याहून |
| ष० | ह्याचा, याचा, ह्याचे, याचे इ० | ह्यांचा, यांचा, ह्यांचे, यांचे इ० |

**टीप**— एणें, ह्याजशीं, याजशीं, इहीं, याजहून इ० रूपें कवितेंत आढळतात.

## ही

| | | |
|---|---|---|
| प्र० | ही, हे | या, ह्या |
| तृ० | हिनें, इनें, हिशीं, इशीं इच्याशीं, हिच्याशीं, इजशीं, हिजशीं, इच्यानें हिच्यानें. | पुल्लिंगाप्रमाणें. |
| च० | हिला, इला, हिजला इजला, हीस, ईस | पुल्लिंगाप्रमाणें. |
| पं० | हीहून, ईहून, हिजहून, इजहून | „ |
| ष० | हिचा, इचा इ० | „ |

**टीप**—हे, इनें, इशीं, हिजला, इजला इ० रूपें कवितेंत आढळतात.

## हें

| | | |
|---|---|---|
| प्र० | हें | हीं |

इतर विभक्तींचीं रूपें पुल्लिंगाप्रमाणें होतात.

**कोण** ( तिन्ही लिंगीं )

| | | |
|---|---|---|
| प्र० | कोण, कवण | कोण, कवण |
| तृ० | कोणें, कवणें, कोणीं कोण्हीं | कोणीं, कोण्हीं, कोणाशीं कोण्हाशीं, कवणाशीं |
| च० | कोणास, कवणास, कोण्हास, कोणाला, कोण्हाला, कोणातें, कोण्हातें | कोणांस, कोण्हांस, कोणांला, कोण्हांला, कोणातें, कोण्हांला, कवणांस |
| पं० | कोणाहून, कोण्हाहून | कोणांहून, कोण्हांहून |
| ष० | कोणाचा, कवणाचा, कोण्हाचा इ० | कोणांचा, कोण्हांचा इ० |

**टीप**—कवण, कवणें, कोण्ही, कोण्हाचा इ० रूपें कवितेंत आढळतात.

**कोणी**

ह्या सर्वनामाचीं तृतीयेपासून विभक्तीचीं रूपें **कोण** शब्दाप्रमाणेंच होतात. **कोण** व **कोणी** हे शब्द विशेषणें असतां ह्यांचें सामान्यरूप कोणे, कोणा, कोण्हे, कोण्हा, कोण्या असें होतें. ह्या दोहोंची योजना सचेतनाबद्दल व त्यांत बहुधा मनुष्याबद्दल होते.

**काय**

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | काय | काय |

ह्या सर्वनामाचीं तृतीयेपासून विभक्तींचीं रूपें **कसा** शब्दाच्या रूपाप्रमाणें होतात; व ह्याची योजना बहुशः अचेतनाबद्दल होते.

## आपण ( तिन्ही लिंगीं )

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | आपण | आपण |
| तृ० | आपण, आपणाशीं, आपल्याशीं, आपणाच्यानें आपल्याच्यानें | आपण, आपणांशीं, आपल्यांशीं, आपणाच्यानें आपल्याच्यानें |
| च० | आपणास, आपणाला आपल्यास, आपल्याला | आपणांस, आपणांला आपल्यांस, आपल्यांला |
| पं० | आपणाहून, आपल्याहून | आपणांहून, आपल्यांहून |
| ष० | आपला-ली-लें इ० | आपला-ली-लें इ० |

## अमुक.

### पुल्लिंग व नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | अमुक | अमुक |

पुढील रूपें पुल्लिंगी व नपुंसकलिंगी अकारांत शब्दाप्रमाणें होतात.

## अमुक.

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | अमुक, अमकी | अमुक, अमक्या |

पुढील रूपें स्त्रीलिंगी ईकारांत शब्दाच्या दुसऱ्या प्रकाराप्रमाणें होतात.

**टीप**—याचप्रमाणें **तमुक** शब्द चालतो.

९४ उभयतां, स्वतः, स्वतां यांचें प्रथमेचें रूप व सामान्यरूप हीं मूळरूपाप्रमाणेंच होतात. एक, परस्पर, अन्योन्य यांचीं रूपें अकारांत शब्दाप्रमाणें तिन्ही लिंगीं सारखींच होतात.

९५ तसा, तसला, तसलाला, तितका, तितकाला, तेवढा, तेवढाला, एवढा, एवढाला, जसा, जसला, जितका, जितकाला, जेवढा, जेवढाला, कसा, कसला, कसलाला, कितका, केवढा, केवढाला, ह्यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें व सामान्यरूपें आकारांत पुल्लिंगी नामाच्या दुसऱ्या व तिसऱ्या प्रकाराप्रमाणें होतात. तशी, अशी, कशी इ० ईकारांत स्त्रीलिंगी नामाच्या दुसऱ्या प्रकाराप्रमाणें चालतात, व तसें, असें, कसें इ० एकारांत नपुंसकलिंगी नामाप्रमाणें चालतात.

## विशेषणविचार.

९६ ज्या विशेषणांचीं प्रथमेचीं एकवचनीं रूपें तिन्ही लिंगीं वेगळालीं ह्मणजे पुल्लिंगी आकारांत, स्त्रिलिंगी ईकारांत, आणि नपुंसकलिंगी एकारांत होतात, त्यांचें मात्र सामान्यरूप चालू भाषेंत उभयवचनीं व तिन्ही लिंगीं **या** किंवा **ए** प्रत्यय लागून होतें. व ते प्रत्यय लागते वेळेस मूळ शब्दांच्या अंत्य स्वराचा लोप होतो. उ०-( पु० ) पांढरा, ( स्त्री० ) पांढरी, ( न० ) पांढरें. ह्यांचें सामान्यरूप पांढऱ्या किंवा पांढरे असें होतें.

**टीप**—इतर विशेषणें चालू भाषेंत कधींही बदलत नाहींत ह्मणजे मूळचें रूपच त्यांचें सामान्यरूप असतें. कवितेंत अकारांत विशेषणाचें सामान्यरूप कधीं कधीं आकारांतही आढळतें. उ०--दीन मनुष्यास, दीन स्त्रीस, दीन मुलास; दहा, अकरा इ० पुरुषांनीं, बायकांनीं, मुलांनीं; तपकिरी, गुलाबी, देशी इ० पदार्थांचा, जिन-

सांचा इ०; कडू, मऊ इत्यादि पदार्थांस; दीना मनुष्यास.

९७ विशेष्याप्रमाणें बदलणाऱ्या विशेषणांचा उपयोग नामाप्रमाणें केला असतां, त्यांचीं प्रथमेचीं उभयवचनें व सामान्यरूपें पुल्लिंगी आकारांत शब्दांच्या, स्त्रीलिंगी ईकारांत शब्दांच्या आणि नपुंसकलिंगी अकारांत शब्दांच्या दुसऱ्या प्रकाराप्रमाणें होतात.

९८ एक, पाच, सात, आठ, वीस, तीस, साठ ह्यांचें सामान्यरूप विकल्पानें **आ** प्रत्यय लागून होतें, आणि एक ह्याचें **ए** प्रत्यय लागूनही होतें. उ०---एक, एका, एके; पांच, पांचा, सात, साता; आठ, आठा इ०

९९ दोन, तीन व चार हे शब्द मनुष्यवाचक शब्दांचीं विशेषणें करावयाचीं असतां पुल्लिंगीं दोघे, तिघे, चौघे किंवा चवघे; स्त्रीलिंगीं दोघी, तिघी, चौघी किंवा चवघी; आणि नपुंसकलिंगीं दोघें, तिघें, चौघें किंवा चवघें हीं रूपें अनुक्रमें त्यांच्या जागीं विकल्पें योजितात. ह्या रूपांपासून कधीं कधीं विवक्षित संख्येपैकीं सर्व असाही बोध होतो. उ०--रामाला चार किंवा चौघे भाऊ आहेत; त्या गृहस्थाला तीन मुली आहेत, त्या **तिघी** चांगल्या ठिकाणीं पडल्या आहेत.

ह्यांचें सामान्यरूप पुल्लिंगीं व नपुंसकलिंगीं **आ** प्रत्यय लागून होतें, आणि स्त्रीलिंगीं वेगळें होत नाहीं. उ०---दोघा, तिघा, चौघा किंवा चवघा; स्त्रीलिंगीं दोघी, तिघी, चौघी किंवा चवघी.

१०० दोन, तीन, चार ह्यांचें सामान्यरूप कधीं कधीं दोहो किंवा दोहीं, तिहीं, चोहो असें तिन्ही लिंगीं सारखेंच होतें.

१०१ दोन, तीन, चार, पांच, सहा, सात, आठ व दहा ह्यांच्या पुढें **ही** हें अव्यय जोडिलें असतां ह्यांचीं संक्षिप्त रूपें दोन्ही, दोनी किंवा दोही; तिन्ही, तिनी किंवा तिही; चाऱ्ही, चारी, किंवा चोही; आणि पाची, साही, साती, आठी व दाही अशीं होतात.

१०२ शेंकडा, हजार, लाख ह्यांचीं शेंकडो, हजारो व लाखो हीं रूपें अनेक शेकडे, अनेक हजार व अनेक लाख असा अर्थ दाखवावयाचा असतां प्रथमेच्या अनेकवचनीं व सामान्यरूपीं योजितात.

१०३ कवितेंत विशेष्याची प्रथमेहून निराळी विभक्ति असतां सर्व विशेषणांचीं सामान्यरूपें होतात किंवा तीं होऊन विशेष्याप्रमाणें त्यांस विभक्ति प्रत्ययही लागतात. उ०—**दीन** किंवा **दीना** किंवा **दीनाला**; कृष्णासि **कृष्णपदभक्तविशारदानें** । जें स्वर्गपुष्प दिधलें मुनि नारदानें; दास्य करावें भावें न असावें मानसें **उदासीनें; सुंदरा** नेत्रांनीं.

१०४ ज्या विशेषणांचीं रूपें तिन्ही लिंगीं वेगळालीं होतात, त्यांचीं सामान्यरूपें करितांना कवितेंत पुल्लिंगीं व नपुंसकलिंगीं **या** प्रत्ययाबद्दल **इया** किंवा **इये** आणि स्त्रीलिंगीं एक वचनीं **इये** आणि अनेकवचनीं **इया** हे प्रत्यय लागून होतात. उ०—**चांगलिया—चांगलिये.**

## क्रियापदविचार.

१०९ ज्या शब्दांना प्रत्यय लागून क्रियापदें होतात त्या शब्दांना **धातु** ह्मणतात. ते **सकर्मक** आणि **अकर्मक** असे दोन प्रकारचे आहेत. अर्थात् त्यांपासून होणारीं क्रियापदेंही सकर्मक व अकर्मक होतात. जसें देतो, दिलें, देईल इत्यादि सकर्मक आणि बसतो, बसला, बसेल इत्यादि अकर्मक होत. कित्येक धातु असे आहेत कीं त्यांची योजना अर्थभेदानें सकर्मक आणि अकर्मक अशी दोन्ही प्रकारांनीं होते. उ०—दार उघडतें, तो दार उघडतो. पहिल्या वाक्यांत उघड धातु अकर्मक व दुसऱ्या वाक्यांत सकर्मक आहे.

**टीप**—जेव्हां धातुबोधित क्रियेचा करणारा आणि त्या क्रियेचें फल भोगणारा हे दोन्ही एकच असतात, तेव्हां तो धातु अकर्मक असतो. जेव्हां ते दोन्ही वेगळाले असतात तेव्हां तो धातु सकर्मक जाणावा. उ०—तो **निजतो**—एथें क्रिया ह्मणजे विसावा घेण्यास अनुकूल जो व्यापार तो करणारा व व्यापाराचें जें फळ विसावा तो भोगणारा ह्या दोन्ही व्यक्ति एकच आहेत, ह्मणून **नीज** धातु अकर्मक आहे. रामा वाघ **मारितो**—एथें मारणें ही क्रिया करणारा रामा आहे, व क्रियेचें जें फल प्राणवियोग तें भोगणारा वाघ आहे, ह्मणून **मार** धातु सकर्मक आहे. गोविंदा मुंबईस **गेला**—एथें जाणें ही क्रिया करणारा गोविंदा असून तिचें फल जें मुंबईस पोंचणें तें गोविंदाकडेच आहे, ह्मणून **जा** धातु अकर्मक आहे.

तसेंच 'मी आपल्याला (स्वतांला) **मारतो**' एथें **मारणें** ही क्रिया व तिचें फल जी पीडा तिचा अनुभव हीं दोन्हीं एकालाच आहेत. ह्यावरून एथें **मार** धातु अकर्मक आहे असें वाटेल, परंतु तें तसें नाहीं. कारण एथें मारणारा व पीडा भोगणारा हे निराळे कल्पिले आहेत असें समजावें.

१०६ जे प्रत्यय धातूंना लागून क्रियापदें होतात त्यांस **आख्यात प्रत्यय** ह्मणतात. ते **काळ, अर्थ, पुरुष, लिंग** आणि **वचन** ह्यांपैकीं कधीं सर्वांचा व कधीं कांहींकांचा बोध करितात.

**काळ.**

१०७ काळाचे **वर्तमान, भूत** आणि **भविष्यत्** असे तीन प्रकार आहेत.

१०८ वाक्य किंवा वाक्यांचा समुदाय उच्चारण्याचा जो काळ तो **वर्तमान काळ**, आणि त्या काळीं घडणारी किंवा संभवणारी जी क्रिया तिला वर्तमान काळची क्रिया ह्मणतात. उ०—वारा वाहतो. हें वाक्य उच्चारण्याच्यावेळीं वारा वाहण्याची क्रिया चालू आहे ह्मणून वाहतो हा **वर्तमान काळ** होय.

१०९ वर्तमानकाळाच्या पूर्वीचा जो काळ तो **भूतकाळ** समजावा. उ०—तो शास्त्र शिकला, तो गेला इ०.

११० वर्तमानकाळापुढें येणारा जो काळ तो **भविष्यत् काळ** जाणावा. उ०-तो जाईल, तो करील इ०.

**टीप**—दिवस केव्हां संपतो व रात्र केव्हां लागते हें जसें बरोबर सांगतां येत नाहीं, तसें भविष्यत्काल केव्हां लागतो व भूतकाल केव्हां संपतो हें सांगतां येत नाहीं; तथापि दिवसाची अखेर व रात्रीचा आरंभ ह्यांच्या संधीचा काल जसा कल्पित आहे, तसा वर्तमान काल हा भूत व भविष्यत् ह्यांचा संधिकाल होय; परंतु व्यवहारांत ज्याला वर्तमान काळ ह्मणण्याची वहिवाट आहे तो वर लिहिल्याप्रमाणें आहे.

## अर्थ.

११८ क्रियापदापासून धात्वर्थ (क्रिया), काळ, पुरुष, वचन व स्थलविशेषीं लिंग ह्यांहून जो कांहीं विशेष बोध होतो त्याला व्याकरणांत **अर्थ** असें ह्मणतात. हे अर्थ दोन आहेत—**विध्यर्थ** आणि **संकेतार्थ**.

**टीप**—(**अ**) क्रियापदापासून क्रिया, काळ, पुरुष, वचन व स्थलविशेषीं लिंग इतक्यांचाच बोध होतो, तेव्हां क्रियापद **स्वार्थी** आहे असें ह्मणण्याचा परिपाठ आहे; परंतु तो मानिल्यापासून विशेष उपयोग आहे असें न वाटल्यावरून तो अर्थाच्या प्रकारांत धरिला नाहीं. तसेंच **संशयार्थ** ह्मणून एक वेगळा अर्थ मानित असतात; परंतु ह्या अर्थीं **अस** धातूखेरीज इतर कोणत्याही धातूंचीं रूपें योजिलेलीं आढळत नाहींत. **अस** धातूचीं तरी भविष्यत्काळचीं मात्र आढळतात; व त्याच रूपांचा तिन्हीकाळीं उपयोग होतो. उ०—रामा शहाणा **असेल**, नदीला दोन पुरुष पाणी **असेल**;

ह्या दोन्ही वाक्यांत **असेल** ह्या क्रियापदापासून शहाणा व दोन पुरुष पाणी ह्यांविषयीं संशय दर्शविला आहे. हींच उदाहरणें पूर्वापर संबंधानें तिन्ही काळीं योजितां येतील.

( इ ) कोणी कोणी 'मी देत असलों', मी देणार असलों', 'मी दिलें असलें', 'मी देणार असेन' इत्यादि उदाहरणांतील क्रियापदें संशयार्थी मानितात; परंतु ह्या वाक्यांचा अर्थ दुसऱ्या वाक्यांची मदत घेतल्यावांचून पूर्ण होत नाहीं. जसें—'मी देत असलों' ह्या वाक्याला 'तर मजपाशीं माग' अशा प्रकारच्या वाक्याची अपेक्षा आहे, ह्मणजे एक क्रिया दुसऱ्या क्रियेवर अवलंबून आहे; ह्मणून अशा उदाहरणांचा **संकेतार्थक** रूपांत संग्रह करावा हें बरें दिसतें. आतां वरील उदाहरणांमध्यें एक क्रिया दुसरीवर अवलंबून आहे खरी, तथापि ह्यांत संशयाचाही बोध होतो; ह्मणून **संशयार्थांत** यांची गणना करावी असें कोणी ह्मणतील, तर याचें उत्तर असें आहे कीं, अशा संशयाचा बोध 'तो गेला तर माझें कार्य होईल' इत्यादि संकेतार्थाच्या उदाहरणांतही होतच असतो, ह्मणून **संशयार्थ** निराळा मानिला पाहिजे असें नाहीं; कारण **संकेतार्थक** क्रियापदाच्या अर्थांत **संशयार्थ** गर्भित असतो.

११२ जेव्हां क्रियापदापासून **आज्ञा, अनुज्ञा, प्रार्थना, धर्म, योग्यता, संभव, रीति, आवश्यकता, स्वभाव** आणि **इच्छा** इत्यादिकांचा बोध होतो, तेव्हां त्यास **विध्यर्थ** म्हणतात. उदाहरणें:—

**आज्ञा**--हा धडा तुह्मीं तयार करा.

**अनुज्ञा** ( परवानगी )---सुटीच्या वेळांत मुलांनीं खेळावें; तो घर विकीत असेल तर विको.

**प्रार्थना**---आपण उद्यां लग्नसमारंभास यावें; देवा मला सद्बुद्धि दे.

**धर्म** ( कर्तव्यकर्म )--मुलानें बापाच्या आज्ञेंत वागावें.

**योग्यता**--श्रीमंतांनीं गरिबांचा समाचार घ्यावा; विद्यार्थ्यानें मिळेल तसें ज्ञान संपादावें.

**संभव**--यंदां पाऊस चांगला पडला आहे, तेव्हां धान्य स्वस्त व्हावें; आज पाऊस पडावा.

**रीति**--आम्हीं लहानपणीं खूप उड्या माराव्या.

**आवश्यकता**--डोळ्यांनीं साफ दिसत नाहीं तर उपनेत्र लावा किंवा लावावें.

**स्वभाव**--पक्ष्यानें उडावें, विस्तवानें जाळावें.

**इच्छा**--आतां आपण जावें, तुह्माला पुत्र होवो.

**टीप**---**विधि** शब्दाच्या अर्थामध्यें आज्ञेचा समावेश होतो, ह्मणून **आज्ञार्थ** निराळा मानिला नाहीं.

११३ जेव्हां एका क्रियेला दुसऱ्या क्रियेची अपेक्षा असते, किंवा एक क्रिया घडली नाहीं ह्मणून दुसरी क्रिया घडत नाहीं असा अर्थ दिसून येतो, तेव्हां त्यास **संकेतार्थ** ह्मणावें. उ०---तो विद्या शिकता तर त्याला

प्रतिष्ठा मिळती. एथें प्रतिष्ठा मिळण्याला विद्या शिकण्याची अपेक्षा आहे. तो आला नाहीं ह्मणून मी जात नाहीं. एथें येण्याची क्रिया घडली नाहीं, ह्मणून जाण्याची क्रिया घडत नाहीं असा बोध होतो.

## पुरुष.

११४ पुरुषांप्रमाणें बदलणाऱ्या क्रियापदांस **प्रथमपुरुषी**, **द्वितीयपुरुषी**, आणि **तृतीयपुरुषी** क्रियापद असें ह्मणतात. मी जातो—ह्या उदाहरणांत **जातों** हें क्रियापद प्रथमपुरुषी आहे, कारण तें मी या प्रमाणें बदललेलें आहे. तूं जातोस—ह्या उदाहरणांत **जातोस** हें क्रियापद द्वितीयपुरुषी आहे, कारण तें तूं ह्याप्रमाणें बदललेलें आहे. तो जातो—ह्या उदाहरणांत **जातो** हें क्रियापद तृतीयपुरुषी आहे, कारण तें तो ह्याप्रमाणें बदललेलें आहे.

## **लिंग** आणि **वचन**.

११५ क्रियापद ज्या शब्दाप्रमाणें बदलतें त्या शब्दाचें जें लिंग किंवा वचन तेंच क्रियापदाचें असें समजावें. उ०—तो चालतो. एथें **चालतो** हें क्रियापद तो ह्याप्रमाणें बदललेलें आहे, ह्मणून **चालतो** हें क्रियापद पुल्लिंगी व एकवचनीं आहे.

११६ आख्यात प्रत्यय हे **कालबोधक**, **अर्थबोधक** व **कालार्थबोधक** असे तीन प्रकारचे आहेत.

## ११७ कालबोधक आख्यातप्रत्यय.

### वर्तमानकाल.

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन. |
|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. | पु. स्त्री. न. |
| प्रथम | तों | तें, त्यें | तें | तों |
| द्वितीय | तोस | तेस, त्येस, तीस | तेंस | तां |
| तृतीय | तो | ते, त्ये, ती | तें | तात |

### करधातु—( सकर्मक ).

#### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी करितों | आह्मी करितों |
| द्वि० | तूं करितोस | तुह्मी करितां |
| तृ० | तो करितो | ते करितात. |

#### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी करितें, करित्यें | आह्मी करितों |
| द्वि० | तूं करितेस, करितीस, करित्येस | तुह्मी करितां |
| तृ० | ती करिते, करिती, करित्ये | त्या करितात. |

#### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी करितें | आह्मी करितों |
| द्वि० | तूं करितेंस | तुह्मी करितां |
| तृ० | तें करितें | तीं करितात. |

**टीप**—( अ ) करितीस, करिती हीं व यासारखीं रूपें फक्त देशावर योजितात. करित्ये, करित्येस हीं व यासारखीं रूपें कोंकणांत आढळतात.

(इ) प्रथम पुरुषीं व द्वितीय पुरुषीं नपुंसकलिंगी क्रियापदें प्रायः भाषेंत आढळत नाहींत.

## बस धातु—( अकर्मक ).

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी बसतों | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतोस | तुह्मी बसतां |
| तृ० | तो बसतो | ते बसतात |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसतें, बसत्यें | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतेस, बसतीस, बसत्येस | तुह्मी बसतां |
| तृ० | ती बसते, बसती, बसत्ये | त्या बसतात |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसतें | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतेस | तुह्मी बसतां |
| तृ० | तें बसतें | तीं बसतात |

### भूतकाल.

### प्रकार पहिला.

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन. |
|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. | पु. स्त्री. न. |
| प्र० | लों | लें, ल्यें | लें | लों |
| द्वि० | लास | लीस | लेंस | लां |
| तृ० | ला | ली | लें | लें, ल्या, लीं |

**टीप**—(अ) हे प्रत्यय अकर्मक व उमजादि सकर्मक धातु ह्यांहून कर्तरि, आचरादि धातूंहून कर्तरि व कर्मणि, आणि इतर सकर्मकांहून कर्मणि व भावे होतात.

(इ) लां प्रत्ययापुढें कधीं कधीं तकार जोडलेला आढळतो.

(उ) लें प्रत्यय भावेही होतो.

(ऋ) **उमजादि** धातु एणें प्रमाणें—उमज, ओक, आंचव, घड, चूक, झोंब, डस, तर, पसव, पाव, पोह, प्रसव, बडबड, बोल, भज, भूल, मूक, लढ, लाग, वद, विसर , विसंब, शीक, शीव (स्पर्श करणें या अर्थी), समज, स्मर, हग, हर, ह्मण, इ०.

(ऌ) **आचरादि** धातु एणें प्रमाणें—आचर, आठव, उतर, चाव, जिंक, थुंक, जेव, नेस, पांघर, शिंकर, खेळ, चढ, पढ, कर (आंघोळ, स्नानसंध्या, फराळ, जेवण हीं कर्मे असतां), गा, पी, ले, इ०.

## राख धातु (सकर्मक)

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन | अनेकवच |
|---|---|---|
| प्र० | मी राखिलों | आह्मी राखिलों |
| द्वि० | तूं राखिलास | तुह्मी राखिलां |
| तृ० | तो राखिला | ते राखिले |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी राखिलें, राखिल्यें | आह्मी राखिलों |
| द्वि० | तूं राखिलीस | तुह्मी राखिलां |
| तृ० | ती राखिली | त्या राखिल्या |

## नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी राखिलें | आह्मी राखिलों |
| द्वि० | तूं राखिलेंस | तुह्मी राखिलां |
| तृ० | तें राखिलें | तीं राखिलीं |

टीप—प्रथम व द्वितीय पुरुषांचीं रूपें प्रायःकवितेंत आढळतात.

## पढ धातु—(सकर्मक)

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी पढलों | आह्मी पढलों |
| द्वि० | तूं पढलास | तुह्मी पढलां |
| तृ० | तो पढला | ते पढले |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी पढलें, पढल्यें | आह्मी पढलों |
| द्वि० | तूं पढलीस | तुह्मी पढलां |
| तृ० | ती पढली | त्या पढल्या |

### नपुंसकलिंग

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी पढलों | आह्मी पढलों |
| द्वि० | तूं पढलेंस | तुह्मी पढलां |
| तृ० | तें पढलें | तीं पढलीं |

## बस धातु—( अकर्मक ).

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी बसलों | आह्मी बसलों |
| द्वि० | तूं बसलास | तुह्मी बसलां |
| तृ० | तो बसला | ते बसले |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसलें, बसल्यें | आह्मी बसलों |
| द्वि० | तूं बसलीस | तुह्मी बसलां |
| तृ० | ती बसली | त्या बसल्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसलें | आह्मी बसलों |
| द्वि० | तूं बसलेंस | तुह्मी बसलां |
| तृ० | तें बसलें | तीं बसलीं |

### भूतकाल.

### प्रकार दुसरा.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | ई, एं | ऊं, ओं |
| द्वि० | स, सी, शी | आं |
| तृ० | ई, ए | त |

**टीप**—( अ ) हे प्रत्यय तिन्ही लिंगीं समान असून कवितेंत तिन्ही काळीं आढळतात व चालू भाषेंत रीतिभूतकाळीं, आणि **ना, पर्यंत, तोंपर्यंत, पावेतों,**

तोंवरी ह्या अव्ययांचा योग असतां तिन्ही काळीं येतात. उ०—करींना, करीना, करीसना (करीनास), करीपर्यंत, बसेपर्यंत इ०.

(इ) प्रथमपुरुषीं ईं व तृतीयपुरुषीं ई हे प्रत्यय सकर्मक धातूंस व एकाक्षरी अकर्मकांस लागतात. उ०—करीं, करी; जाईं, जाई; लिहीं, लिही, इ०.

(उ) उमजादि धातूंस, सांग, माग, बघ, खेळ, चढ, पढ या धातूंस व अनेकाक्षरी अकर्मकांस प्रथमपुरुषीं एं व तृतीयपुरुषीं ए हे प्रत्यय लागतात. उ०—सांगें, सांगे; बोलें, बोले; बसें, बसे, इ०.

(ऋ) लिह खेरीज हकारांत धातूंस व आचरादि गणांतील पहिले दहा धातूंस हे दोन्ही प्रकारचे प्रत्यय विकल्पानें लागतात. उ०—राहें, राहे, राहीं, राही; जेवें, जेवे, जेवीं, जेवी इ०.

(ऌ) स प्रत्ययापूर्वी एकाक्षरी धातूंस ई आगम विकल्पें होतो व त्याचा मागील स्वराशीं संधि होत नाहीं. उ०—पिईस, पीस; होईस, होस इ०.

(ए) ओं प्रत्यय कवितेंत आढळतो.

### कर धातु—(सकर्मक).

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी करीं | आह्मी करूं |
| द्वि० | तूं करिसी, करीस, करिशी | तुह्मी करां |
| तृ० | तो, ती, तें करी | ते, त्या, तीं करीत |

## बस धातु—( अकर्मक ).

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | मी बसें | आह्मी बसूं |
| द्वि० | तूं बसस, बससी, बसशी | तुह्मी बसां |
| तृ० | तो, ती, तें बसे | ते, त्या, तीं बसत |

**टीप**—करिसी, करिशी, बससी, बसशी अशीं रूपें कवितेंत आढळतात.

## भविष्यत् काळ.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | ईन, एन | ऊं, ओं |
| द्वि० | शील | आल |
| तृ० | ईल, एल | तील |

**टीप**—( अ ) हे प्रत्यय तिन्ही लिंगीं समान आहेत.

( इ ) **एन, एल** हे प्रत्यय अनेकाक्षरी अकर्मक धातूंस, उमजादि धातूंस व सांग, माग, बघ, खेळ, चढ, पढ इत्यादिं धातूंस लागतात; व **ईन, ईल** हे प्रत्यय इतर सकर्मक धातूंस व एकाक्षरी अकर्मक धातूंस लागतात.

( उ ) आचरादि गणांतील पहिले दहा धातूंस हे दोन्ही प्रकारचे प्रत्यय विकल्पें लागतात.

( ऋ ) **ओं** हा प्रत्यय कवितेंत आढळतो.

**कर धातु—( सकर्मक ).**

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी करीन | आह्मी करूं |
| द्वि० | तूं करिशील | तुह्मी कराल |
| तृ० | तो, ती, तें करील | ते, त्या, तीं करितील |

**बस धातु—( अकर्मक ).**

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसेन | आह्मी बसूं |
| द्वि० | तूं बसशील | तुह्मी बसाल |
| तृ० | तो, ती, तें बसेल | ते, त्या, तीं बसतील |

**११८ अर्थबोधक आख्यातप्रत्यय.**

**विध्यर्थ.**

**प्रकार पहिला.**

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुं. लिंग. | पु. | स्त्री. | न. |
| प्र० | आवा | आवी | आवें | आवे | आव्या | आवीं |
| द्वि० | आवास | आवीस | आवेंस | आवेत | आव्यात | आवींत |
| तृ० | आवा | आवी | आवें | आवे-आवेत | आव्या-आव्यात | आवीं आवींत |

**टीप**—( अ ) हे प्रत्यय सकर्मकाहून कर्मणि व भावे, आणि अकर्मकाहून कर्तरि व भावे असे होतात.

( इ ) चालू भाषेंत प्रथमपुरुषीं व द्वितीय पुरुषीं प्रथमांत कर्मे येत नाहींत, कवितेंत क्वचित् येतात.

( उ ) द्वितीय पुरुषीं व तृतीय पुरुषीं अनेकवचनीं प्रत्ययांपुढें त हें अक्षर बोलण्यांत कधीं कधीं योजितात.

## धर धातु—( सकर्मक )

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी धरावा | आह्मी धरावे |
| द्वि० | तूं धरावास | तुह्मी धरावेत |
| तृ० | तो धरावा | ते धरावे, धरावेत |

### स्त्रीलिंग

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी धरावी | आह्मी धराव्या |
| द्वि० | तूं धरावीस | तुह्मी धराव्यात |
| तृ० | ती धरावी | त्या धराव्या, धराव्यात |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी धरावें | आह्मी धरावीं |
| द्वि० | तूं धरावेंस | तुह्मी धरावींत |
| तृ० | तें धरावें | तीं धरावीं, धरावींत |

## बस धातु–( अकर्मक )

### पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसावा | आम्ही बसावे |
| द्वि० | तूं बसावास | तुम्ही बसावे |
| तृ० | तो बसावा | ते बसावे |

## स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी बसावी | आम्ही बसाव्या |
| द्वि० | तूं बसावीस | तुम्ही बसाव्यात |
| तृ० | ती बसावी | त्या बसाव्या, बसाव्यात |

## नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसावें | आम्हीं बसावीं |
| द्वि० | तूं बसावेंस | तुम्ही बसावींत |
| तृ० | तें बसावें | तीं बसावीं, बसावींत |

## प्रकार दुसरा.

## कर्तरि.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | ऊं, ओ | ऊं, ओं |
| द्वि० | ईं, ई; एं, ए | आ |
| तृ० | ओं, ऊ | ओत, ऊत |

**टीप**—(अ) प्रथमपुरुषाच्या प्रत्ययांपासून आज्ञा मागणें किंवा संमति दाखविणें ह्यांचा बोध होतो; द्वितीय पुरुषाच्या प्रत्ययांपासून आज्ञा, प्रार्थना किंवा उपदेश करणें ह्यांचा बोध होतो; व तृतीयपुरुषाच्या प्रत्ययांपासन इच्छा, आशीर्वाद किंवा शाप यांचा बोध होतो.

(इ) **ओं, ई, ईं, ए, एं, ऊ, ऊत** हे प्रत्यय कवितेंत मात्र आढळतात.

(उ) कर, पी, दे अशीं धातूचीं जीं मूळचीं रूपें तींच द्वितीयपुरुषीं एकवचनीं प्रत्ययांवांचून योजितात.

### धर धातु—(सकर्मक).

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी धरूं, धरों | आह्मी धरूं, धरों. |
| द्वि० | तूं धर, धरीं, धरी. | तुह्मी धरा. |
| तृ० | तो, ती, तें धरो, धरू. | ते, त्या तीं, धरोत, धरूत. |

### बस धातु—(अकर्मक).

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसूं, बसों. | आह्मीं बसूं, बसों. |
| द्वि० | तूं बस, बैस, बसें, बसे. | तुह्मी बसा. |
| तृ० | तो, ती, तें बसो, बसू. | ते, त्या, तीं बसोत, बसूत. |

### कालार्थबोधक प्रत्यय

### संकेतार्थी—(भूतकाळीं)

### कर्तरि.

| पुरुष. | एकवचन. | | | अनेकवचन. |
|---|---|---|---|---|
| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. | पु. स्त्री. न. |
| प्र० | तों | तें | तें | तों |
| द्वि० | तास | तीस | तेंस | तां |
| तृ० | ता | ती | तें | ते, त्या, तीं |

टीप—(अ)-हे प्रत्यय लागून क्रिया घडली नाहीं असाहि बोध होतो.

(इ) इतर काळीं संकेतार्थीं निराळे प्रत्यय नाहींत. कालबोधक प्रत्ययच त्या त्या काळीं जर, तर (कवितेंत) जरी, तरी इत्यादि अव्ययांचा योग असतां संकेतार्थीं योजितात, व ज्या क्रियेवर दुसरी क्रिया अवलंबून असते ती क्रिया वर्तमानकाळीं व भविष्यत्काळीं दाखवावयाचीं असतां भूतकालच्या आख्यात प्रत्ययांनींही ती दर्शविली जाते. जसें—तो बसला तर हा बसेल, तो बसतो तेव्हां हा बसतो, तो बसेल तेव्हां हा बसेल. इ०.

### धर धातु—(सकर्मक)

#### पुल्लिंग.

| पुरुष | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी धरितों | आह्मी धरितों |
| द्वि० | तूं धरितास | तुह्मी धरितां |
| तृ० | तो धरिता | ते धरिते |

#### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी धरितें | आह्मी धरितों |
| द्वि० | तूं धरितीस | तुह्मी धरितां |
| तृ० | ती धरिती | त्या धरित्या |

#### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी धरितें | आह्मी धरितों |
| द्वि० | तूं धरितेंस | तुह्मी धरितां |
| तृ० | तें धरितें | तीं धरितीं |

## बस धातु–( अकर्मक )

### पुल्लिंग.

| पुरुष | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी बसतों | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतास | तुह्मी बसतां |
| तृ० | तो बसता | ते बसते |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसतें | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतीस | तुह्मी बसतां |
| तृ० | ती बसती | त्या बसत्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी बसतें | आह्मी बसतों |
| द्वि० | तूं बसतेंस | तुह्मी बसतां |
| तृ० | तें बसतें | तीं बसतीं |

१२० आख्यात प्रत्यय जोडितांना धातूस होणारे विकार एणेंप्रमाणें आहेत.

१२१ सकर्मक धातूंस व्यंजनादि आख्यातप्रत्यय जोडितांना ऱ्हस्व इ आगम होतो, व अकारांत एकाक्षरी प्रत्यय जोडितांना दीर्घ ई आगम होतो, आणि ह्या दोन्ही आगमांपूर्वी धातूच्या अंत्य स्वराचा लोप होतो. उ०—मारितो, मारिला, लिहीत, मारीत इ०. परंतु (अ) आचरादि गणांतील पहिले दहा धातूंस हे दोन्ही आगम विकल्पानें होतात. उ०—आठवितो, आठवतो; जेवीत,

जेवत; जिंकीत, जिंकत इ०. (इ) उमजादि धातु, लिह खेरीज हकारांत धातु, सांग, माग, बघ, खेळ, चढ, पढ हे धातु व एकाक्षरी धातु ह्यांस वरील दोन्ही आगम होत नाहींत. उ०—पढत, पोहत, बोलत इ०.

**टीप**—व्यंजनादि आख्यात प्रत्यय जोडितांना हा आगम बोलतांना नियमानें आढळत नाहीं. उ०—मारतो, मारला, इ०.

१२२ धातूच्या उपांत्य अक्षरांत दीर्घ **ई** किंवा **ऊ** असल्यास प्रत्यय लागतांना ते ऱ्हस्व होतात. उ०—शीक—शिकत, चूक—चुकत इ०.

१२३ स्वरादि काल किंवा अर्थ ह्यांचे बोधक प्रत्यय एकाक्षरी धातूंना जोडितांना त्यांचा संधि होत नाहीं आणि ते अनेकाक्षरी धातूंना जोडितांना धातूच्या अंत्याचा लोप होतो. उ०—दे+ई=देई, दे+ईल=देईल, दे+ऊं किंवा ओ=देऊं किंवा देओ, कर+ई किंवा ईल=करी किंवा करील, बस+ए=बसे, बस+एल=बसेल.

१२४ एकाक्षरी ईकारांत किंवा एकारांत, व ओकारांत धातूस **आं** किंवा **आ** हा कालार्थक प्रत्यय जोडितांना धातूच्या अंत्य **ई** किंवा **ए** ह्यास **य्**, आणि **ओ** ह्यास **व्** हे आदेश होतात, आणि धू धातूच्या अंत्यास **उव्** आदेश होतो. उ०—पी+आ=प्या, घे+आ=घ्या, हो+आ=व्हा, धू+आ=धुवा.

१२५ **पी, वी, भी** आणि **धू** यांना काल किंवा अर्थ किंवा कालार्थ ह्यांचे बोधक प्रत्यय जोडितांना

धातूच्या अंत्यास ऱ्हस्व आदेश होतो. जसें—पितो, वितो, भितो, धुतो, पिईल, भिईल, विईल, धुईल, पितां इ०.

१२६ तृतीय पुरुषीं विध्यर्थी प्रकार दुसरा ह्यांतील **ओ, ऊ, ओत, ऊत** हे प्रत्यय एकाक्षरी धातूंना जोडितांना प्रत्ययामागें विकल्पानें व् लागतो. जसें—घेवो–घेओ, देवो–देओ, होवो–होओ, घेवूत–घेऊत इ०.

१२७ आकारांत व ओकारांत धातूंना प्रथम पुरुषीं **ई** व तृतीय पुरुषीं **ई** ह्या प्रत्ययांबदल कवितेंत कधीं कधीं **य** प्रत्यय होतो. जसें—जाई–जाय, गाई–गाय, होई–होय.

१२८ भूतकालाचे पहिलें प्रकारांतील प्रत्यय जोडावयाचे असतां धातूंस पुढील विकार होतात.

कर, खण, घाल, जा, दे, पाव, मर, ह्मण, ये, ले, हो, हाण, खा ह्या धातूंस भूतकालचा **ल** प्रत्यय जोडितांना अनुक्रमें के, खंट ( विकल्पानें ), घात, गे, दि किंवा दिध, पात ( विकल्पानें ) मे, ह्मट ( विकल्पानें ), आ, ह्मा किंवा जहा ( कवितेंत ), ल्या किंवा ल्याय, हांट ( विकल्पानें ), खाद किंवा खादि असे आदेश होतात. जसें—केला, इत्यादि.

१३० पळ, ऊड, ह्मण, जळ, वीझ, ऊब, कळ, गळ, बूड, ह्या धातूंस विकल्पानें, आणि पीं, वी, भी ह्या धातूंस नियमानें धातु व **ल** प्रत्यय यांच्यामध्यें **आ** आगम होतो. उ०–पळाला किंवा पळला इ०, आणि प्याला इ०.

१३१ सांग, माग, धू, घे, बघ, ह्मण, हाण ह्या धातूंपैकीं अनेकाक्षरी धातूंस **इत** आणि एकाक्षरी धातूंस **त** हे आगम धातु व प्रत्यय यांच्यामध्यें होतात व अशा वेळेस **धू** धातूचा अंत्य ऱ्हस्व होतो. उ०—सांगितलें, मागितलें, ह्मणितलें, धुतलें, घेतलें इ०.

१३२ गा, धा, मा ह्यांस **ल** प्रत्यय जोडितांना **य** आणि **इ** हे आगम विकल्पानें होतात. उ०—गायला, गाइला इ०.

१३३ **चाल** आदिकरून धातूंस **इ** आणि **धाड** आदिकरून धातूंस **इय** असे आगम कवितेंत विकल्पें होतात. जसें—चालिला, चालला, धाडियले, धाडले, धरियले, धरिले, पाहियले, पाहिले इ०.

१३४ धांव, हास, गर्ज इ० धातूंस **ल** प्रत्यय जोडितांना कवितेंत विकल्पानें धातु आणि प्रत्यय ह्यांच्यामध्यें **इन्न** आगम होतो. उ०—धांविन्नला, धांवला; गर्जिन्नला, गर्जला; हासिन्नला, हासला इ०

१३५ अनियमित धातूंचीं रूपें.—

## अस धातु

### वर्तमानकाल

### प्रकार पहिला.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी आहे. | आह्मी आहों. |
| द्वि० | तूं आहेस. | तुह्मी आहां. |
| त० | तो, ती, तें आहे | ते, त्या, तीं आहेत. |

## प्रकार दुसरा

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असतों. | आम्ही असतों |
| द्वि० | तूं असतोस. | तुह्मी असतां |
| तृ० | तो असतो. | ते असतात |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असत्यें, असतें. | आह्मी असतों |
| द्वि० | तूं असतेस, असत्येस, असतीस. | तुह्मी असतां |
| तृ० | ती असते, असत्ये, असती. | त्या असतात |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असतें. | आह्मी असतों. |
| द्वि० | तूं असतेंस. | तुह्मी असतां. |
| प्र० | तें असतें. | तीं असतात. |

**टीप**—वर्तमानकाळीं व भूतकाळीं **अस** धातूच्या पहिल्या प्रकारच्या रूपांपासून केवळ **अस्तित्वाचा** बोध होतो व दुसऱ्या प्रकारच्या रूपांपासून **रीतीचा**ही बोध होतो. कवितेंत मात्र ह्या भेद सर्वत्र असतो असें नाहीं.

## भूतकाल.

## प्रकार पहिला.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतों | आम्हीं होतों |
| द्वि० | तूं होतास | तुह्मी होतां |
| तृ० | तो होता | ते होते |

## स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतें, होत्यें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतीस | तुह्मी होतां |
| तृ० | ती होती | त्या होत्या |

## नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुह्मी होतां |
| तृ० | तें होतें | तीं होतीं |

**टीप**—**अस्** धातूला संस्कृतांत भूतकाळीं **भू** आदेश होतो. **भू** या धातूचें प्राकृत भाषेच्या द्वारें मराठींत **हो** असें रूप होतें, ह्मणून **अस्** धातूचीं रूपें भूतकाळीं **हो** धातूप्रमाणें चालतात.

## प्रकार दुसरा.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असें | आह्मी असूं, असों |
| द्वि० | तूं असस | तुह्मी असां |
| तृ० | तो, ती, तें असे | ते, त्या, तीं असत |

**टीप**—इतर धातूंचीं **ला, ली, लें** हे प्रत्यय लागून झालेलीं रूपें जशीं भूतकाळीं योजण्यांत येतात, तशीं **अस** धातूचीं असला, असली, असलें इत्यादि रूपें योजण्यांत येत नाहींत. तीं संकेतार्थीं मात्र योजण्यांत येतात. जसें तो असला, ती असली तर इ०.

## भविष्यत्काळ.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असेन | आम्ही असूं |
| द्वि० | तूं असशील | तुह्मी असाल |
| तृ० | तो, ती, तें असेल | ते, त्या, तीं असतील |

**टीप—अस** धातूचीं भविष्यत्काळचीं दुसऱ्या प्रकारचीं रूपें नाहींत.

## विध्यर्थ.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असावा | आम्ही असावे |
| द्वि० | तूं असावास | तुह्मी असावे |
| तृ० | तो असावा | ते असावे, असावेत |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असावी | आम्ही असाव्या |
| द्वि० | तूं असावीस | तुह्मी असाव्या |
| तृ० | ती असावी | त्या असाव्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असावें | आम्हीं असावीं |
| द्वि० | तूं असावेंस | तुह्मी असावीं |
| तृ० | तें असावें | तीं असावीं |

## स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतें, होत्यें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतीस | तुह्मी होतां |
| तृ० | ती होती | त्या होत्या |

## नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुह्मी होतां |
| तृ० | तें होतें | तीं होतीं |

**टीप**—**अस्** धातूला संस्कृतांत भूतकाळीं **भू** आदेश होतो. **भू** या धातूचें प्राकृत भाषेच्या द्वारें मराठींत **हो** असें रूप होतें, ह्मणून **अस्** धातूचीं रूपें भूतकाळीं **हो** धातूप्रमाणें चालतात.

## प्रकार दुसरा.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असें | आह्मी असूं, असों |
| द्वि० | तूं असस | तुह्मी असां |
| तृ० | तो, ती, तें असे | ते, त्या, तीं असत |

**टीप**—इतर धातूंचीं **ला, ली, लें** हे प्रत्यय लागून झालेलीं रूपें जशीं भूतकाळीं योजण्यांत येतात, तशीं **अस** धातूचीं असला, असली, असलें इत्यादि रूपें योजण्यांत येत नाहींत. तीं संकेतार्थीं मात्र योजण्यांत येतात. जसें तो असला, ती असली तर इ०.

## भविष्यत्काळ.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | मी असेन | आम्ही असूं |
| द्वि० | तूं असशील | तुह्मी असाल |
| तृ० | तो, ती, तें असेल | ते, त्या, तीं असतील |

**टीप**—**अस** धातूचीं भविष्यत्काळचीं दुसऱ्या प्रकारचीं रूपें नाहींत.

## विध्यर्थ.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | मी असावा | आम्ही असावे |
| द्वि० | तूं असावास | तुह्मी असावे |
| तृ० | तो असावा | ते असावे, असावेत |

### स्त्रीलिंग.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | मी असावी | आम्ही असाव्या |
| द्वि० | तूं असावीस | तुह्मी असाव्या |
| तृ० | ती असावी | त्या असाव्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | मी असावें | आम्हीं असावीं |
| द्वि० | तूं असावेंस | तुह्मी असावीं |
| तृ० | तें असावें | तीं असावीं |

## प्रकार दुसरा.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी असूं | आह्मी असूं |
| द्वि० | तूं अस, ऐस | तुम्ही असा |
| तृ० | तो, ती, तें असो, असूं | ते, त्या, तीं असोत, असूत |

## संकेतार्थ

### प्रकार पहिला

#### पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असतों | आम्ही असतों |
| द्वि० | तूं असतास | तुम्ही असतां |
| तृ० | तो असता | ते असते |

#### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असतें | आम्ही असतों |
| द्वि० | तूं असतीस | तुम्ही असतां |
| तृ० | ती असती | त्या असत्या |

#### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असतें | आम्ही असतों |
| द्वि० | तूं असतेंस | तुम्ही असतां |
| तृ० | तें असतें | तीं असतीं |

### प्रकार दुसरा.

#### पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असलों | आम्ही असलों |
| द्वि० | तूं असलास | तुम्ही असलां |
| तृ० | तो असला | ते असले |

| पु. | एकवचन. स्त्रीलिंग. | अ. वचन |
|---|---|---|
| प्र० | मी असलें-ल्यें | आम्ही असलों |
| द्वि० | तूं असलीस | तुम्ही असलां |
| तृ० | ती असली | त्या असल्या |

**नपुंसकलिंग.**

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी असलें | आम्ही असलों |
| द्वि० | तूं असलेंस | तुम्ही असलां |
| तृ० | तें असलें | तीं असलीं |

**टीप**—ह्या दोन्ही प्रकारच्या रूपांवरून एक क्रिया दुसऱ्या क्रियेवर अवलंबून आहे असा अर्थ असून पहिल्या प्रकारच्या रूपांवरून त्या क्रिया घडल्या नाहींत असाही अर्थ निघतो. उ०—'इच्छा असती तर उपाय सुचते' ह्मणजे इच्छा नसल्यानें उपाय सुचले नाहींत. 'इच्छा असली ह्मणजे उपाय सुचतात,' या वाक्यावरून क्रिया घडल्या नाहींत असा बोध होत नाहीं. क्रिया घडली किंवा नाहीं असा संशय दाखवावयाचा असतां अस धातूच्या भविष्यत्कालाच्या रूपाचा प्रयोग भूतकालींही होतो. उ०—दहा वर्षांपूर्वी तो मोठा श्रीमंत असेल; परंतु आज त्याजवळ कवडी देखील नाहीं.

**हो धातु** ( असणें या अर्थी ).

**वर्तमानकाळ.**

| पुरुष | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होय | आह्मी होय |
| द्वि० | तूं होस, होसी, होशी | तुह्मी होय, होत |
| तृ० | तो, ती, तें होय | ते, त्या, तीं होत |

## भूतकाल.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतों | आह्मी होतों |
| द्वि० | तूं होतास | तुह्मी होतां |
| तृ० | तो होता | ते होते |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें, होत्यें | आह्मी होतों |
| द्वि० | तूं होतीस | तुह्मी होतां |
| तृ० | ती होती | त्या होत्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आह्मी होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुह्मी होतां |
| तृ० | तें होतें | तीं होतीं |

**टीप**—हीं रूपें **अस** धातूच्या भूतकाळीं योजितात.

## हो धातु ( बनणें या अर्थी )

## वर्तमानकाळ.

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतों | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतोस | तुह्मी होतां |
| तृ० | तो होतो | ते होतात |

स्त्रीलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतें, होत्यें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतेस, होत्येस, होतीस | तुह्मी होतां |
| तृ० | ती होते, होत्ये | त्या होतात |

नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आह्मी होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुह्मी होतां |
| तृ० | तें होतें | तीं होतात |

भूतकाळ.

प्रकार पहिला.

पुल्लिंग.

| पुरुष | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी झालों | आह्मी झालों |
| द्वि० | तूं झालास | तुह्मी झालां |
| तृ० | तो झाला | ते झाले |

स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी झालें, झाल्यें | आह्मी झालों |
| द्वि० | तूं झालीस | तुह्मी झालां |
| तृ० | ती झाली | त्या झाल्या |

नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी झालें | आह्मी झालों |
| द्वि० | तूं झालेंस | तुह्मी झालां |
| तृ० | तें झालें | तीं झालीं |

**टीप—झालों** इत्यादि रूपें वस्तुतः **जातः** ह्या संस्कृत धातुसाधिताचीं अपभ्रष्ट रूपें आहेत. हींच रूपें कवितेंत जालों, जहालों व जाहलों अशीं आढळतात.

### प्रकार दुसरा.

| पुरुष | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होई | आह्मी होऊं |
| द्वि० | तूं होस, होईस | तुह्मी व्हां |
| तृ० | तो, ती, तें होई | ते, त्या, तीं होईत, होत |

### भविष्यत् काळ.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होईन | आह्मी होऊं |
| द्वि० | तूं होशील | तुह्मी व्हां |
| तृ० | तो, ती, ते होईल | ते, त्या, तीं होतील |

### विध्यर्थ.

### प्रकार पहिला.

#### पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी व्हावा | आह्मी व्हावे |
| द्वि० | तूं व्हावास | तुह्मी व्हावेत |
| तृ० | तो व्हावा | ते व्हावे |

#### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी व्हावी | आह्मी व्हाव्या |
| द्वि० | तूं व्हावीस | तुह्मी व्हाव्या |
| तृ० | ती व्हावी | त्या व्हाव्या |

## नपुंसकलिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी व्हावें | आम्ही व्हावीं |
| द्वि० | तूं व्हावेंस | तुम्ही व्हावीं |
| तृ० | तें व्हावें | तीं व्हावीं |

## प्रकार दुसरा.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होऊं | आम्ही होऊं |
| द्वि० | तूं हो | तुम्ही व्हा |
| तृ० | तो, ती, तें होवो-ओ होऊ-होवू | ते, त्या, ती, होवोत, होओत होवूत-होऊत |

## प्रकार तिसरा.

## पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी हवा | आह्मी हवे |
| द्वि० | तूं हवास | तुह्मी हवेत |
| तृ० | तो हवा | ते हवे |

## स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी हवी | आह्मी हव्या |
| द्वि० | तूं हवीस | तुह्मी हव्यात |
| तृ० | ती हवी | त्या हव्या |

## नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी हवें | आह्मी हवीं |
| द्वि० | तूं हवेंस | तुह्मी हवींत |
| तृ० | तें हवें | तीं हवीं |

**टीप**—(अ) या रूपांचा उपयोग केव्हां केव्हां विशेषणासारखा होतो, व सामान्यरूप **हव्या** असें होतें. हें विशेषण आणि त्याचें विशेष्य ह्यामध्यें तो हें दर्शक-सर्वनाम नेहमीं येतें. उ०—हव्या त्या जाग्यावर बैस.

( इ ) या रूपांपासून आवश्यकता व इच्छा ह्या दोन अर्थांचा बोध होतो. उ०—मला काशीस जाण्यास बरेच रुपये हवेत—येथें आवश्यकता, व मला बसायास घोडा हवा. येथें इच्छा या अर्थाचा बोध होतो.

( उ ) हीं रूपें योजिलीं असतां कर्ता चतुर्थ्यंत असतो.

## संकेतार्थ

### पुल्लिंग.

| पुरुष. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मी होतों | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतास | तुम्ही होतां |
| तृ० | तो होता | ते होते |

### स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतीस | तुम्ही होतां |
| तृ० | ती होती | त्या होत्या |

### नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मी होतें | आम्ही होतों |
| द्वि० | तूं होतेंस | तुम्ही होतां |
| तृ० | तें होतें | तीं होतीं |

**पूर्ण वर्तमान** ( अ ) भूतकाळीं घडलेल्या क्रियेचा **परिणाम सांप्रत आहे** या अर्थी. उ०—मीं व्यापार केला आहे, ह्मणजे पूर्वी मीं व्यापार केला असून सध्यां त्यापासून होणारा परिणाम किंवा नफा नुकसान मला कळत आहे.

( इ ) भूतकाळीं क्रिया घडलेली असून तिचा **परिणाम प्रस्तुत नसतांही** तो अद्यापि **आहे असा भास व्हावा** ह्मणून ह्या रूपाची योजना कधीं कधीं होत असते. उ०—भीष्मादि सभेंत बसले आहेत, द्रौपदीला दुःशासनानें सभेंत ओढून आणिली आहे इ०.

**पूर्ण रीति वर्तमान**—भूतकाळीं घडलेला **परिणाम सांप्रत असण्याची रीत** ह्या अर्थी. उ०—मी जातो तेव्हां तो तेथें बसला असतो.

**उद्देश वर्तमान**—भविष्यत्काळीं करावयाची जी क्रिया तिचा **प्रस्तुत काळीं बेत** ह्या अर्थी. उ०—मी उद्यां अर्ज करणार आहे.

**उद्देश रीति वर्तमान**—दुसऱ्या एका क्रियेच्या संबंधानें भविष्यत्काळीं क्रिया करण्याचा सांप्रत काळचा **बेत** व तो करण्याची **रीति** ह्या अर्थी. उ० तूं शिकावयाला येतोस तेव्हां मी बाहेर जावयाला निघणार असतों.

### भूतकाळ.

**शुद्ध भूत**—क्रिया पूर्वी घडली ह्या अर्थी. उ०—तो बसता झाला, त्यानें करून टाकिलें इ०.

**अपूर्ण भूत** ( अ ) भूतकाळीं क्रिया **चालू होती** ह्या अर्थीं. उ० मी बसत होतों, मी करीत होतों.

( इ ) भूतकाळीं क्रिया करण्याची **इच्छा** या अर्थीं उ०—मी बसत होतों पण तो नको ह्मणाला, ह्मणजे माझी बसण्याची इच्छा होती, पण इ०.

( उ ) भूतकाळीं क्रियेची **रीत** ह्या अर्थीं उ०—मी लहानपणीं येथें बसत होतों.

**अपूर्ण रीतिभूत**—भूतकाळीं क्रिया करण्याची **रीत**, अथवा एकाच काळीं **रीति** व **अपूर्णता** ह्या अर्थीं उ०—मी बसत असें, मी करीत असें.

**पूर्णभूत** ( अ ) दुसऱ्या एकाद्या भूतकाळाच्या क्रियेच्यापूर्वी क्रिया **होऊन गेलेली असणें** ह्या अर्थीं उ०—मी गेलों होतों तेव्हां तो जेवला होता, ह्मणजे मी जाण्यापूर्वी त्याचें जेवण संपलें होतें.

( इ ) भूतकाळीं क्रियेला आरंभ होऊन ती भूतकाळींच संपली, परंतु तिचा **परिणाम सांप्रत असेल** किंवा **नसेल** ह्या अर्थीं उ०—मला एक मुलगा झाला होता, त्यानें चित्र केलें होतें.

**पूर्ण रीतिभूत**—दुसऱ्या एकाद्या भूतकाळच्या क्रियेच्यापूर्वी क्रियेला आरंभ होत असून तशी **करण्याची रीति असणें** ह्या अर्थीं उ०—मी जाई तेव्हां तो बसला असे.

**उद्देशभूत**—( अ ) भूतकाळीं विवक्षित काळाच्या संबंधानें भविष्यत्काळीं क्रिया करण्याचा **बेत, निश्चय**

किंवा **संभव** ह्या अर्थी उ०—गतवर्षी मी मुंबईस जाणार होतों.

(इ) अशा प्रकारचा बेत, निश्चय किंवा संभव **सिद्धीस गेला नाहीं** ह्या अर्थी उ०—हा घटकेनें जन्मता तर राजा होणार होता, ह्मणजे झाला असता; तेवढ्यानें तुझें काय दरिद्र जाणार होतें? ह्मणजे गेलें असतें?

**उद्देश रीतिभूत**—भूतकाळीं विवक्षितकालाच्यासंबंधानें भविष्यत्काळीं क्रिया करण्याचा **बेत, निश्चय** किंवा **संभव** व तो **करण्याची रीति** ह्या अर्थी—उ० तो येई तेव्हां मी जाणार असें.

## भविष्यत्काल.

**शुद्ध भविष्यत्**—भविष्यत् कालिक **शक्ति, संभव, निश्चय** इत्यादि अर्थी उ०—मी बसून राहीन, तो करून टाकील.

**अपूर्ण भविष्यत्**—विशेषकालाला अनुलक्षून भविष्यत्काळीं क्रिया चालू असणें किंवा फक्त **क्रिया चालू असण्याची रीति** ह्या अर्थी उ०—तूं येशील तेव्हां मी स्नान करीत असेन.

**पूर्ण भविष्यत्**—विशेष कालाला अनुलक्षून भविष्यत् कालीं क्रिया **संपल्याचा संभव** किंवा फक्त क्रिया **चालू असण्याची रीति** ह्या अर्थी. उ०—तूं येशील तेव्हां मी बसलों असेन.

**उद्देश भविष्यत्**—दुसऱ्या एखाद्या भविष्यत् कालाच्या क्रियेच्या संबंधानें त्यापुढील भविष्यत्काळीं **क्रिया**

**करण्याचा उद्देश** किंवा ती **करण्याच्या बेताची रीति** ह्या अर्थी. उ०—तूं येशील तेव्हां मी काम करणार असेन.

## अव्ययविचार.

### शब्दयोगी अव्यय.

१९६ शब्दयोगी अव्ययांचे मुख्य दोन वर्ग आहेत; **सामान्यरूप करणारीं** व **सामान्यरूप न करणारीं**

१९७ **सामान्यरूप करणाऱ्या** अव्ययांचे अर्थ विभक्ति प्रत्ययांचे अर्थाशीं मिळतात व कधीं कधीं त्या अर्थांचे जवळ जवळ असतात, ह्मणून त्यांस विभक्त्यर्थक अव्ययें ह्मणतात. ह्यांचे पांच प्रकार येणें प्रमाणें—

१ **तृतीयार्थक**—कडून, करून, जवळ, द्वारा, द्वारें, नजीक, निशीं, पायीं, पाशीं, प्रमाणें, बरहुकूम, बराबर, बरोबर, मुळें, वतीनें, सकट, संगतीं, संगें, सन्निध, समवेत, सरसा, सरसें, सरशी, सरशीं, सह, सहवर्तमान, हातून, (कवितेंत) करवीं, कून, पाडें, पास, मेळें, वें, संगवें, सवें, हातें, इ०.

२ **चतुर्थ्यर्थक**—अर्थ, अर्थी, ऐवजीं, कडे, कडेस, करितां, खातर, प्रत, प्रीत्यर्थ, बद्दल, बदला, मोबदला, साठीं, स्तव, (कवितेंत) कारणें, निमित्त, निमित्तें, परतें, प्रति, लागिं, लागीं, लागून, लागोनी, लागोनि, लागोनियां, वतीं, वारीं, हारीं इ०.

३ **पंचम्यर्थक**—आंतून, उप्रांत, कडून, खेरीज, जवळून, तागाईत, नंतर, पासून, पेक्षां, पर्यंत, पावेतों, व-

रून, वांचून, विना, विरहित, वेगळ, व्यतिरिक्त, शिवाय, हातून, ( कवितेंत ) अंगून, कडोनि, कडोनियां, जवळोन, जवळोनियां, परतें, परी, परीस, पावोनिया, पासाव, पासोनि, पासोनी, पासोनियां, पासोनीयां, वांचोन, वांचोनियां, विणें, वीण इ०.

४ **षष्ठ्यर्थक**—संबंधी, विषयीं, ( कवितेंत ) विसीं.

५ **सप्तम्यर्थक**—आंत, उपर, आलीकडे, अगोदर, आड, आडून, अंतीं, एथें, खालीं, तेथें, पलीकडे, पुढें, पूर्वीं, पोटीं, पैकीं, बाहेर, भोंवतीं, भोंवतालें, भोंवतालून, मध्यें, मागें, वर, विषयीं, समोर, सभोंवतीं, ( कवितेंत ) अंतरीं, अभ्यंतरीं, अभ्यांतरीं, उपकंठीं, उपरि, ठायीं, ठाया, ठाईं, भीतर, भीतरीं, मधें, मधीं, माजीं, माझारीं, वरी, वेरी.

**टीप**—( अ ) **स्थलवाचक** अव्ययांस **ऊन** प्रत्यय लागून झालेलीं शब्दयोगी अव्ययें **पंचम्यर्थक** असतात. उ०—मागून, पुढून, बाहेरून इ०.

( इ ) कांहीं शब्दयोगी अव्ययें मुळचींच **विभक्त्यंत** रूपें आहेत व कांहीं **अपभ्रष्ट विभक्त्यंत** रूपें आहेत. उ०—कडे, कडेस, विसीं, विषयीं इ०.

( उ ) कांहीं शब्दयोगी अव्ययें मुळचीं **संस्कृत अव्ययें** आहेत. उ०—विना, पर्यंत, नंतर, अनंतर, प्रत, प्रति इ०.

**( ऋ ) करून, प्रमाणें, पाडें, द्वारें, वांचून विना,**

**विणें** इ० अव्ययांच्या पूर्वी विभक्त्यंत रूपें येतात. उ०—तेणें करून, येणें प्रमाणें इ०.

(ऌ) कांहीं शब्दयोगी अव्ययें **धातूपासूनच झालेलीं** आहेत. उ०-करून, करितां, पावोनि, लागून इ०.

(ए) कोणी **त** हा सप्तमीचा विभक्तिप्रत्यय मानितात; परंतु तो वास्तविक **आंत** या शब्दयोगी अव्ययाचाच अवयव आहे. **आंत** हें शब्दयोगी अव्यय जोडितांना अनेक ठिकाणीं त्याचा प्रतिपदिकाच्या सामान्यरूपाशीं पूर्वरूप संधि होतो, ह्यामुळें **आ** हा अवयव दिसत नाहीं. शिवाय अव्ययसाधित विशेषणाचा **ला** व **ईल** प्रत्यय हे **आंत** यास लागतात. उ०—घरांतला, घरांतील इ०.

(ऐ) **पर्यंत, पावेतों** इत्यादि शब्दयोगी अव्ययें क्रियापदासही जोडितात. उ०— करीपर्यंत, बसेपावेतों, इत्यादि.

(ओ) कांहीं शब्दयोगी अव्ययें **षष्ठ्यंत सामान्यरूपापुढें** योजितात. उ०—त्याच्यामागें, घराच्यावर इ०.

(औ) कांहीं शब्दयोगी अव्ययांचा उपयोग कधीं कधीं **विशेषणात्मक अव्ययांप्रमाणें** होतो व तेव्हां त्यांच्या योगानें मागील शब्दाचें सामान्यरूप होत नाहीं. उ०—तो पुढें जातो, ती मागें राहिली, इ०. हीं अव्ययें येणेंप्रमाणें—अगोदर, अलीकडे, आड, एथें, खालीं, जवळ, तेथें, नजीक, नंतर, पलीकडे, पुढें, पूर्वी, बाहेर, भोंवतीं, भोंवतालीं, मध्यें, मागें, वर संनिध, समीप, सभोंवतें, स-

भोंवतीं, समोर, आणि **ऊन** प्रत्ययान्त स्थलवाचक अव्ययें.

१९८ **सामान्यरूप न करणारीं** शब्दयोगी अव्ययें केवलप्रयोगी व उभयान्वयी अव्ययाशिवाय हव्या त्या शब्दापुढें जोडितां येतात. उ०—रामाच येईल, तीपण आजारी आहे, तोही येऊंदे, तो काम करीतच असतो, इ०. **ह्यांचे** पांच प्रकार येणेंप्रमाणें:—

१ **संग्रहबोधक**—तरी, देखील, पण, हि, ही, सुद्धां, इत्यादि.

२ **निश्चयबोधक**—च, तर, ह्मणून इ०.

३ **कैवल्यबोधक**—केवळ, च, ची, पण, बरीक, फक्त, मात्र, इ०.

४ **प्रश्नार्थक**—का, कीं, ना इ०.

५ **पादपूरक**—पैं, नी इ०.

## उभयान्वयी अव्यय.

१९९ उभयान्वयी अव्ययांचे सहा प्रकार येणेंप्रमाणें:—

१ **समुच्चयबोधक** (अनेकांचा संग्रहकरणारें)—आणि, आणखी, आणिक, व, न. उ०—तो न मी जातो इ०.

२ **पक्षांतरबोधक** (अनेकांपैकीं एक दाखविणारें)—अथवा, अगर, किंवा, ना, (कवितेंत) कीं.

३ **कारणबोधक**—(ज्या दोन वाक्यांमध्यें हीं अव्ययें येतात त्यांच्या अर्थांत कार्यकारणभाव दाखविणारें)—अतएव, कारण, कीं, तस्मात्, तेव्हां, कारण कीं, कां कीं, ह्मणून, ह्मणजे, इ०.

४ **स्वरूपबोधक** ( मागील शब्द किंवा वाक्य ह्या-च्या अर्थ पुढील शब्द किंवा वाक्य ह्यानें स्पष्ट केला आहे असें दाखविणारें )---कीं, ह्मणजे, ह्मणून इ०.

५ **संकेतबोधक** (एक क्रिया दुसऱ्या क्रियेवर अव-लंबून आहे असें दाखविणारें )–जर, तर, तेव्हां, ह्मणजे, यद्यपि, तथापि, ( कवितेंत )जरी, तरी, जऱ्ही, तऱ्ही, य-दपि, तदपि इ०.

**टीप**—पद्यांत **जरी, तरी** हीं अव्ययें **संकेतबोधक** व गद्यांत **न्यूनत्वबोधक** असतात.

६ **न्यूनत्वबोधक** ( पहिल्या वाक्यांत दर्शविलेल्या क्रियेचा परिणाम व्हावा तसा न होणें हा कमतरपणा दाखविणारें )–जरी, तरी, पण, परंतु, यद्यपि, तथापि, ( कवितेंत ) परी इ०.

## विशेषणात्मक अव्यय.

१६० विशेषणात्मक अव्ययाचे मुख्य तीन वर्ग एणेंप्रमाणें—

**कालबोधक**—जेव्हां, तेव्हां, केव्हां, एव्हां, कधीं, काल, आज, आतां, मग, उद्यां, परवां, तेरवां; (आवृत्तिबोधक) वारंवार, पुनः पुनः, पुन्हा, मातक्यान, सदां, सर्वदां, एकदां, दोनदां, इ०. ( क्रमबोधक पहिल्यानें ) दुसऱ्यानें, इ०; क्वचित्, यंदा, अंमळशानें, पूर्वीं, पुढें, एरवीं, तूर्त, सध्यां, अद्यापि, अजून, जों, तों, नंतर, रोज, अलीकडे, प्रथम, अगोदर, ना ( शेत पिकलें ना खाल्लें ), कीं, ह्मणजे ( तो आला **कीं**

अथवा **ह्मणजे** मी येईन ); (कवितेंत) जेधवां, तेधवां, जैं, तैं, कैं, इ०.

२ **स्थलबोधक**— जेथें, तेथें, एथें, जिकडे, तिकडे, इकडे, कोठें, खालीं, वर, पुढें, मागें, बाहेर, जवळ, दूर, लांब, पलीकडे, अलीकडे, समोर, भोंवतें, नजीक, समीप, सन्निध, जेथून, तेथून, एथून, घरोघर, घरोघरीं, गल्लोगल्लीं, अन्यत्र, एकत्र, सर्वत्र; (कवितेंत) जेथोनि, जेथोनियां, कोठोनि, वरूनि, जवळिके इ०.

३ **प्रकारबोधक** अव्ययांचे विभाग येणेंप्रमाणें:—

(अ) **गुणबोधक**—हळू, स्पष्ट, सुरेख, सावकाश, मधुर, असें, कसें इ०.

(इ) **निश्चयबोधक**—खचीत, खरोखर, खरा, अवश्य, अगत्य, हटकून, जरूर, निःसंशय, अलबत, खास, निभ्रांत इ०.

(उ) **संशयबोधक**—क्वचित्, बहुधा, बहुतकरून, बहुशः, कदाचित्, प्रायः इ०.

(ऋ) **प्रश्नबोधक**—कां, काय, ना इ०.

(ऌ) **अहेतुबोधक**— उगीच, सहज, निष्कारण, निरर्थक, व्यर्थ, फुकट इ०.

(ए) **हेतुबोधक**—जाणून, समजून, मुद्दाम, बुध्या, जाणूनबुजून, समजूनउमजून, बुद्धिपुरःसर इ०.

(ऐ) **अनुकरणबोधक**—धाडकन, धाडकर, चरचर, धाडदिशीं, चटचट, चरचरा, खडखड, टरटर, चुरचुर, फाडकन, फाडदिशी, फुरकन, मटमट, करकरा इ०.

(ओ) **निषेधबोधक**—न, ना, ने; (कवितेंत) नो.

(औ) **तारतम्यबोधक**—(कमजास्तपणा दाखविणारें)—अधिक, अति, अतिशय, अगदीं, अत्यंत, ऐन, एकपट, दुप्पट, कमी, केवळ, खूप, जास्त, थेट, निवळ, पुष्कळ, फार, बहुत, भर इ०.

(क) **तुलनाबोधक**—जसें, तसें; (कवितेंत) एवीं, केवीं, जेवीं, ज्यापरी, त्यापरी, यापरी इ०

**टीप**—(१) काल व स्थल ह्यांशिवाय क्रियेशीं अन्वय पावणाऱ्या विशेषणात्मक अव्ययांस प्रकारबोधक असें ह्मटलें आहे. तीं अनेकार्थक आहेत आणि त्यांपैकीं मुख्य मुख्य अव्ययें अर्थासह एथें दिलीं आहेत.

(२) संस्कृत भाषेंतील कांहीं विभक्त्यंत शब्द व अव्ययें मराठींत येतात आणि त्यांची योजना विशेषणात्मक अव्ययां प्रमाणें होते. उ०—जात्या, शास्त्रदृष्ट्या, वस्तुदृष्ट्या, वस्तुतः, स्वतः, द्विधा, बहुधा, क्रमशः, बहुशः, अन्यथा, सर्वथा, पूर्ववत्, पुनः, प्रायः, क्वचित् इ०.

## केवल प्रयोगी अव्यय

१६१ केवलप्रयोगी अव्ययाचे प्रकार एणें प्रमाणें—

(१) **आनंदबोधक**— ओहो, अहाहा, वाहवा, यंव इ०.

(२) **दुःखबोधक**—हाय, हायहाय, हायरे, अरेरे, आयआय, आयाई इ०.

(३) **स्तुतिबोधक**—ओहो, ठीक, भले, यंव, वाः, वाहवा, शाबास इ०.

( ४ ) **धिक्कारबोधक**—अहाहा, इश्श, अंः, उंः, छट्, छिट्, छे, थुः, थूथू, फुस्, धिक् इ०

( ५ ) **अनुज्ञाबोधक**—हं, हुं, इ०

( ६ ) **प्रतिबंधबोधक**---चप्, चिप्, चुप्, गप्, बस्, हट्, इ०

( ७ ) **निषेधबोधक**---छट्, छिः, छेः छे, अंह, उंहु, इ०.

( ८ ) **स्वीकारबोधक**—जी, ठीक, बरें, हं, हो, होय इ०.

( ९ ) **विस्मयबोधक** अबब, अहा, हं, हंहं, हां इ०.

( १० ) **प्रश्नबोधक**—अं, हं इ०.

( ११ ) **प्रेरणाबोधक**— झा, शुक्, हट्, हर्र, हैक, हड, इ०.

( १२ ) **संबोधनबोधक.**

| | पुल्लिंगी व नपुंसकलिंगी | स्त्रीलिंगी. |
|---|---|---|
| एकवचन— | अरे, रे, बा, हो, अगा, गा, हे ए, अजी | अगे, गे, ए, हे, ग, गो |
| अनेकवचन— | अहो, हो, अजी, अगा | अहो, हो, अगा |

---

# साधित शब्द विचार.

## प्राकृतिक शब्द विचार

१६२ प्रकृतीस विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय ह्यां-खेरीज इतर प्रत्यय जोडून जे साधित शब्द होतात त्यां-तील प्रकृति **नाम**, **विशेषण**, **धातु** व **अन्यय** हीं

असतात, आणि ह्यांस प्रत्यय जोडून प्रत्येकापासून चार चार प्रकारचे साधित शब्द होतात.

१६३ नामाचे चार प्रकार येणेंप्रमाणें:— (१) नामसाधित नामें, (२) विशेषणसाधित नामें, (३) धातु साधित नामें, (४) अव्ययसाधित नामें.

१६४ विशेषणाचे चार प्रकार येणेंप्रमाणें:— (१) नामसाधित विशेषणें, (२) विशेषणसाधित विशेषणें, (३) धातुसाधित विशेषणें, (४) अव्ययसाधित विशेषणें.

१६५ धातूचे चार प्रकार येणेंप्रमाणें:— (१) नामसाधित धातु, (२), विशेषणसाधित धातु, (३) धातु साधित धातु, (४) अव्ययसाधित धातु.

१६६ अव्ययाचे चार प्रकार येणेंप्रमाणें:— (१) नामसाधित अव्ययें, (२) विशेषणसाधित अव्ययें, (३) धातुसाधित अव्ययें, (४) अव्यय साधित अव्ययें.

## नामसाधित नामें.

१६७ नामांस जे प्रत्यय लागून साधितनामें होतात ते प्रत्यय व त्यांचे अर्थ पुष्कळच आहेत; त्यांपैकीं मुख्य मुख्य प्रत्यय व त्यांचे अर्थ एणेंप्रमाणें आहेत.

**प्रकार पहिला—स्वार्थी** प्रत्यय ( प्रकृतीचा मूळ अर्थ ज्या प्रत्ययांनीं बदलत नाहीं ते )—

१ **आ** (पुल्लिंग) उ०—चुरा, जोडा.

२ **आडी** (स्त्रीलिंग) उ०—नासाडी, राखाडी.

३ **आरा** (पु०) उ०—ढिगारा, उबारा, तांबारा.

४ **ई** (स्त्री०) उ०—अर्जी, जोडी.

५ **कर** (पु० ) उ०—तांबटकर, विणकर.

६ **का** (स्त्री० ) उ०—माळका, सुटका.

७ **गा** (पु० ) **गी** (स्त्री० ( **गे** ) न०--उ०—मुलगा, मुलगी, मुलगें; पोरगा इ०.

८ **जी** (पु० ) उ०—भटजी, गुरुजी.

९ **टी** (स्त्री० ) उ०—शेपटी, भुगटी.

१० **डा** (पु० ) उ०—आंकडा, जीवडा.

११ **डी** (स्त्री० ) उ०-पंचकडी, छकडी.

१२ **ता** (पु० ) **ती** (स्त्री० ) **तें** उ०— गोणता, चढती, गोणतें.

१३ **पट** (स्त्री०) उ०—लोळपट, खणपट.

१४ **या** (पु० स्त्री० ) उ०—देवभक्त्या (पु० ), आत्या (स्त्री० ).

**प्रकार दुसरा**—(अ) **कुत्सितत्व** (निंद्यपणा) **बोधक** प्रत्यय—

१ **आड** (नपुंकलिंग ) उ०—उराड, भिताड.

२ **टा** (पु० ), **टी** (स्त्री० ), **टें** (न० ) उ०—पोरटा, पोरटी, पोरटें; चोरटा, चोरटी, चोरटें.

३ **डा** (पु० ) उ०—गोसावडा, महारडा.

४ **पट्टी** (स्त्री० ) उ०—खरडपट्टी, झोडपट्टी.

५ **रूं** (न० ) उ०—ह्मसरूं, वाघरूं.

६ **वडा** (पु० ) उ०— कीर्तवडा (वाईटकीर्ति ), धिंडवडा.

(इ) **क्षुद्रत्व** (नीचपणा ) **बोधक** प्रत्यय—

१ या (पु०) उ०—केशा, गण्या, दाम्या, विशा.

२ ई (स्त्री०) उ०—आनी, पारी, यमी, वारी.

**टीप**—हे प्रत्यय जोडितांना विशेषनामाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या अक्षरांतील पहिल्या व्यंजनापुढील सर्व वर्णांचा लोप होतो; व क्वचित् प्रत्ययांतील यकाराचाही लोप होतो.

(उ) **न्यूनत्व** (लहानपणा) **बोधक** प्रत्यय —

१ **अट** (न०) उ०—सळपट, धलपट.

२ **अली** (स्त्री०) उ०—दिवली, सुपली.

३ ई (स्त्री०) उ०—विरटी, घुमटी (लहाल घुमट)

४ **कुली** (स्त्री०) उ०—चांदकुली, घरकुली.

५ **कें** (न०) उ०—डेरकें, ढोलकें.

६ **टी** (स्त्री०) उ०—आगटी, थापटी.

७ **डी** (स्त्री०) उ०—तबकडी, पलंगडी.

**प्रकार तिसरा**—(अ) **धंदा** किंवा **अधिकार** या-अर्थी प्रत्यय—

१ ई (स्त्री०) उ०—चिटणिशी, चाकरी.

२ **की** (स्त्री०) उ०—पाटिलकी, महारकी.

३ **गिरी** (स्त्री०) उ०—शिपायगिरी, वैद्यगिरी.

(इ) **स्वामित्व** किंवा **स्वामित्वाखालील प्रदेश** अथवा **काळ** या अर्थी प्रत्यय.

१ **आई** (स्त्री) उ०—पेशवाई, मोगलाई.

२ **आण** (न) उ०—फिरंगाण (फिरंग्याचा मुलुख), हबसाण.

३ ई (स्त्री०) उ०— आखाडी (आखाडाचे दिवस), खोती (खोताचा अधिकार किंवा अधिकाराखालील जमीन).

**प्रकार चवथा—लडिवाळपणा** किंवा **सत्कार** या अर्थी प्रत्यय—

१ **ऊ** पु० (स्त्री०) उ०—दामू, सदू, यमू, भागू,

**टीप**—विशेषनामांस हा प्रत्यय लागतांना क्षुद्रताबोधक **या** प्रत्ययाप्रमाणें मागील प्रकृतींत फेरफार होतात.

२ **जी** (पु० स्त्री०) उ०—कृष्णाजी, शिवाजी, संताजी, विठोजी, बिडाजी.

३ **बा** (पु०)—उ० खंडोबा, पांडोबा, शिवबा.

**टीप**—ह्या प्रत्ययापूर्वी **ऊ** चा गुण होतो.

**प्रकार पांचवा—समुदायार्थी** प्रत्यय—

१ **आड** (न०) उ०—रिपाड, लिंदाड.

२ **आळ** (न०) उ०—किटाळ, भेंडाळ.

३ **आळें** (न०) उ०—दंताळें, संताळें.

४ **ई** (स्त्री०) उ०—झाडी, पत्री.

५ **एरा** (पु०) उ०—पातेरा, मातेरा.

६ **वड** (स्त्री०) उ०—खजवड, शितवड.

७ **वंड** (स्त्री०) उ०—केळवंड साळवंड.

**प्रकार सहावा—सदृश** या अर्थी प्रत्यय—

१ **आ** (पु०) उ०—चिमटा, तुंबा.

२ **आळें** (न०) उ०—गोंडाळें, मुठाळें.

३ (स्त्री०) उ०—चिकी, बोंडी.

४ **ळा** (पुं०) उ०--धुरळा (धुरासारखा जाणारा केर).

**प्रकार सातवा—स्थलबोधक** प्रत्यय—

१ **आईत, आयत** (न०) उ०—बागाईत, बागायत, जिराईत, जिरायत.

२ **आड** (स्त्री०) उ०—नरकाड.

३ **आडें** (न०) उ०—धुराडें.

४ **आर** (न०) उ०—भुयार, शिवार.

५ **आवळ** (स्त्री०) उ०—खाणावळ.

७ **वड** (स्त्री०) उ०—खतवड.

८ **वडा** (पु०) उ०—म्हारवडा.

६ **डा** (पु०) **डी** (स्त्री०), **डें** उ०---पायडा (पाय ठेवण्याचें ठिकाण), झोपडी, झोपडें.

**प्रकार आठवा—महत्वबोधक** प्रत्यय—

१ **आ** (पु०) उ०—चुला, डबा

**प्रकार नववा—वृक्षबोधक** प्रत्यय—

१ **ई** (स्त्री०) उ०—कापशी, डाळिंबी.

**प्रकार दहावा—उदक** ( त्या त्या पदार्थाशीं मिश्रित उदक ) **बोधक** प्रत्यय—

१ **वणी** (न०) उ०—गुळवणी, चिंचवणी, ताकवणी, पेजवणी, मधवणी.

**प्रकार अकरावा—तैलबोधक** प्रत्यय—

१ **एल** (न०) उ०— आवळेल, उदेल, खोबरेल, मोगरेल.

**प्रकार बारावा—भूषणबोधक** प्रत्यय—

१ आ (पु०) उ०---कंठा.

२ ई (स्त्री) उ०--आंगठी, कंठी.

**प्रकार तेरावा--मूल्यबोधक** प्रत्यय----

१ आवळ (स्त्री०) उ०--घडणावळ, दळणावळ, धुणावळ, शिवणावळ.

**प्रकार चवदावा--बीजबोधक** प्रत्यय.

१ ई (स्त्री०) उ०--एरंडी, अंबाडी.

२ ओळी (स्त्री०) उ०--पारोळी, निंबोळी.

**प्रकार पंधरावा--लिंगबोधक** प्रत्यय.—

( अ ) **पुल्लिंग बोधक**--

१ आ (पु०) उ०-- घोडा, टोपला, फळा.

( इ ) **स्त्रीलिंग बोधक**---

१ अ उ०--कीड, नात.

२ ई उ०--देवी, फळी.

३ ईण उ०--परटीण, वाघीण.

४ ऊ उ०--काकू.

५ ण उ०--गवळण, मावळण.

(उ) **नपुंसक** किंवा **जातिबोधक** प्रत्यय—

१ ऊं उ०—बकरूं, शेरडूं.

२ एं उ०—बकरें, टोपलें.

३ वंड उ०—नातवंड, भावंड.

**प्रकार सोळावा—पात्रबोधक** प्रत्यय—

१ अंडी (स्त्री०) उ०—कासंडी (काशीतलें भांडें).

२ आळ ( न० ) उ०—गंगाळ.

३ ई (स्त्री.) उ०-गंगाजळी (गंगाजलाचें पात्र), मथुरी.

प्रकार सतरावा—रोगबोधक प्रत्यय—

१ अ ( स्त्री० ) उ०—मांड.

२ ई ( स्त्री० ) उ०—कोपरी, गुडघी.

३ उरडें ( न० ) उ०—नखुरडें, हिंगुरडें (हिंग खाल्यानें टोंचल्या जागीं होणारा रोग)

प्रकार अठरावा—कालबोधक प्रत्यय—

१ आळा (पु०) उ०—उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा.

प्रकार एकोणिसावा—स्थितिबोधक प्रत्यय—

१ वड ( स्त्री० ) उ०—चोरवड.

२ वडा ( पु० ) उ०—पोरवडा, झारवडा.

प्रकार विसावा—धर्मबोधक प्रत्यय—

१ आत किंवा आयत ( स्त्री० ) उ०—वकिलात, वकिलायत.

२ की ( स्त्री० ) उ०—पाटिलकी, माणुसकी.

प्रकार एकविसावा—चिन्हबोधक प्रत्यय—

१ टा ( पु० ) उ०—बाहुटा.

प्रकार बाविसावा—युक्तपदार्थबोधक प्रत्यय—

१ ण ( स्त्री० ) उ०—कुंपण, गोफण, पोखरण.

२ डा ( पु० ) उ०—कोनडा, कोनाडा.

## विशेषणसाधित नामें.

१६८ विशेषणसाधित नामें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात—

**प्रकार पहिला–धर्मबोधक** प्रत्यय—

१ **आ** (पु०) उ०–खराबा, ताठा.
२ **आई** (स्त्री०) उ०–कमताई, चिकणाई, धिटाई.
३ **आयत** (स्त्री०) उ०–कबुलायत.
४ **ई** (स्त्री०) उ०–आगांतुकी, गरिबी, लांबी.
५ **ईक** (स्त्री०) उ०–मोकळीक, वेगळीक.
६ **उंडा** (पु०) उ०–गारुंडा.
७ **ओपा** (पु०) उ०–एकोपा.
८ **की** (स्त्री०) उ०–टवाळकी, लबाडकी.
९ **गिरी** (स्त्री०) उ०–लुच्चेगिरी, सावधगिरी.
१० **ठा** (पु०) उ०–गारठा.
११ **ण** (स्त्री०) उ०–ताठण, लांबण.
१२ **पण** (न०) उ०–चांगुलपण, शहाणपण.
१३ **पणा** (पु०) उ०–थोरपणा, साधेपणा.
१४ **वा** (पु०) उ०–ओलावा, गारवा, थंडावा.
१५ **वी** (स्त्री०) उ०–थोरवी.

**प्रकार दुसरा–पदार्थबोधक** प्रत्यय—

१ **ई** (स्त्री०) उ०–आंबटी, सफेती.

**प्रकार तिसरा-गुणाकार बोधक** प्रत्यय—

१ **आई** (स्त्री०) उ०–सवाई.
२ **ई** (स्त्री०) उ०–दिढी.
३ **एं** (न०) उ०–एकोत्रें.
४ **कें** (न०) उ०–अडीचकें.

**प्रकार चवथा–वयबोधक** प्रत्यय—

१ ई (स्त्री०) उ०–चाळिशी, तिशी, पंचविशी.

**प्रकार पांचवा–स्थलबोधक** प्रत्यय—

१ अ (स्त्री०) उ०–पांढर (पांढरी जमीन). तांबड.

२ ई (स्त्री०) उ०—काळी (काळी जमीन).

**प्रकार सहावा–कालबोधक** प्रत्यय—

१ एरें (न०) उ०—सातेरें (सातदिवस).

२ ओपा (पु०) उ०–शिळोपा (थंडवेळ).

३ वडा (पु०) उ०–आठवडा, पंधरवडा.

**प्रकार सातवा–साधनबोधक** प्रत्यय—

१ आ (पु०) उ०—पत्ता, रोखा.

**प्रकार आठवा–क्रियाबोधक** प्रत्यय—

१ आमत (स्त्री०) उ०–खुशामत.

**प्रकार नववा–भाजकबोधक** प्रत्यय—

१ ई (स्त्री०) उ०–एकी.

२ की (स्त्री०) उ०–बेकी.

**प्रकार दहावा–समुदायबोधक** प्रत्यय—

१ एं (न०) उ०–अकरें.

२ क (पु०) उ०–चौक (चोहोंचा एक असा समुदाय), चोक, पंचक, सप्तक.

३ कडी (स्त्री०) उ०–छकडी.

## धातुसाधित नामें.

१६९ धातुसाधित नामें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात.

**प्रकार पहिला—व्यापारबोधक** प्रत्यय—

१ **आ** (पु०) उ०—मारा, चावा, उचका, हिसका.

२ **आई** (स्त्री०) उ०—चढाई, लढाई.

३ **आव** (पु) उ०--आडकाव, टिकाव.

४ **आवें** (न) उ०—करावें, चिरावें.

५ **ई** (स्त्री०) उ०—उकळी, उलटी, उचकी.

६ **ऊं** (न०) उ०—रडूं, हसूं.

**टीप**—रडूं, हसूं इत्यादिकांचें प्रथमेशिवाय रूप आढळत नाहीं.

७ **एं**—(न०) उ०—रडें, हसें.

८ **ओका** (पु०)—अटोका.

९ **ण** (न०) उ०—कांडण, सडण.

१० **णी** (स्त्री) उं०—मिळवणी, लावणी.

११ **णूक** (स्त्री०) उ०—करमणूक, जाचणूक, वर्तणूक.

१२ **णें** (न०) उ०—करणें, रडणें.

**टीप**—करणें, रडणें इत्यादि रूपें कधीं कधीं कवितेंत व पत्रव्यवहारांत क्रियापदा ऐवजीं योजितात.

१३ **ती** (स्त्री०) उ०—गणती, भरती.

१४ **प** (न०) उ०—तळप, वाढप (वाढणें)

१५ **व** (स्त्री०) उ०—धेव, देव.

१६ **वण** (स्त्री०) उ०—वाढवण, हगवण.

**टीप**—कित्येक धातूंना निराळे प्रत्यय न लागतां ते धातूच पुल्लिंगी किंवा स्त्रीलिंगी नामें होतात. उ०—झड, पड, मार, मोड, रड इ०.

**प्रकार दुसरा—साधनबोधक** प्रत्यय.—

१ **आत** ( स्त्री० ) उ०—वरात (स्वीकारण्याचें पत्र).

२ **ई** ( स्त्री० ) उ०—कढई, खर्ची.

३ **ओसा** ( पु० ) उ०—अडोसा, पडोसा.

४ **ण** ( न० ) उ०—अडकण, कालवण, चाळण.

५ **णी** ( स्त्री० ) उ०—काढणी, फुकणी, लेखणी.

६ **णें** ( न० ) उ०—कोरणें, गाळणें.

७ **त** ( स्त्री० ) उ०—अडात (पाटाचा पाय).

१ **ती** (स्त्री०) उ०—कुडती, गळती(अभिषेक पात्र)

**प्रकार तिसरा—स्थलबोधक** प्रत्यय.—

१ **ण** ( स्त्री० ) उ०—उतरण, चढण.

२ **त** ( स्त्री० ) उ०—उगवत (पूर्व दिशा), मावळत (पश्चिम दिशा).

**प्रकार चवथा—ज्यावर क्रिया घडते** त्या पदार्थाचा बोधक प्रत्यय.—

१ **आ** ( पु० ) उ०—चारा.

२ **ऊ** ( पु० ) उ०—खाऊ.

३ **ण** ( न० ) उ०—कांडण (कांडण्याचा पदार्थ), दळण.

**प्रकार पांचवा—मूल्यबोधक** प्रत्यय—

१ **आई** ( स्त्री. ) उ०—घडाई, लिखाई.

२ **ईत** ( न० ) उ०—घडीत.

३ **लाई** ( स्त्री० ) उ०—धुलाई, शिलाई (शिवधातूच्या वचा लोप होतो).

**प्रकार सहावा--ज्यावर क्रिया घडली** त्या पदार्थाचा बोधक प्रत्यय.

१ **आ** (पु०) उ०—उतारा, चोंदा, धुवा.

२ **आत** (स्त्री०) उ०—जमात.

३ **आव** (पु०) उ०—जमाव.

४ **आवळ** (स्त्री०) उ०—जथावळ.

५ **ई** (स्त्री०) उ०—कढी, चुणी.

६ **ईत** (स्त्री०) उ०—घडीत, उकळीत.

७ **ण** (न०) उ०—अळण, कढण.

८ **णी** (स्त्री०) उ०—चिरणी, वाटणी.

**टीप**--कांहीं धातूंस प्रत्यय न लागतांही त्यापासून कर्मार्थी नामें होतात. उ०—उकड, उसळ, काप इ०

**प्रकार सातवा—क्रियाधिक्यबोधक** प्रत्यय.

१ **आट** (पु०) उ०—कडकडाट, कलकलाट, गडगडाट.

**अव्यय साधित नामें.**

१७० अव्ययसाधित नामें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात—

**प्रकार पहिला—ध्वनिबोधक** अव्ययांस लागणारें प्रत्यय—

१ **आ** (पु०) उ०—तडा, बुडबुडा

२ **आका** (पु०) उ०—तडाका

३ **क** (स्त्री०) उ०--थडक, धडक.

४ **की** (स्त्री०) उ०—टिमकी.

५ ड (स्त्री०) उ०—घुमड , धुमड.

६ वा (पु०) उ०—पोंवा.

प्रकार दुसरा--अतिशयबोधक प्रत्यय—

१ शा (पु०) उ०--धुमशा.

## नामसाधित विशेषणें.

१७१ नामसाधित विशेषणें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात.

प्रकार पहिला-- युक्त ह्या अर्थी प्रत्यय—

१ आ (विशेष्यनिघ्न ह्मणजे विशेष्याच्या लिंगा प्रमाणें बदलणारा ) उ०--तान्हा, शेंबडा

२ आळ (तिन्ही लिंगी) उ०—चिकाळ, खडकाळ.

३ आळू (ति० लिं०) उ०—झोपाळू, मायाळू.

४ इष्ट (ति०लिं०) उ०—कोपिष्ट, भ्रमिष्ट.

५ ई (ति०लिं०) उ०-छंदी, ढोंगी.

६ ईक (ति०लिं०) उ०—सडीक, पडीक.

७ ईल (ति०लिं०) उ०—जटील, डागीळ.

८ एरा (वि.) उ०--धाणेरा, गोंडेरा.

९ एल (ति०लिं०) उ०--रंगेल, तंडेल (वितंडवाद करणारा).

१० कट (ति०लिं०) उ०—तेलकट, धुरकट.

११ कर (ति०लिं०) उ०—खेळकर, खोडकर.

१२ करी (ति०लिं०) उ०—गाडेकरी, तापकरी.

१३ का (वि०) उ०—मळका, लाडका.

१४ खोर (ति०लिं०) उ०—कज्जेखोर, संशयखोर

१५ **ट** ( ति०लिं० ) उ०—खवट, घामट

१६ **ड** ( ति०लिं० ) उ०—रेतड

१७ **डा** ( वि० ) उ०—खरुजडा, खरजुडा, वांकडा

१८ **दार** (ति. ल.) उ०--अणीदार, कंठोदार

१९ **रा** (वि.) उ०--दुखरा, लाजरा

२० **वट** (ति. लिं.) उ०--तारवट, माळवट

२१ **वंट** (ति. लिं.) उ०--वाळवंट

२२ **वंत** (ति. लिं.) उ०--गरजवंत, कलावंत

२३ **वाईक** (ति. लिं.) उ०--खटलेवाईक, तऱ्हेवाईक, शिरस्तेवाईक.

२४ **वान** (ति. लिं.) उ०--गाडीवान, बागवान

२५ **वार** (ति. लिं.) उ०--तपशीलवार, बेतवार.

२६ **वाला** (वि.) उ०—कंठीवाला, गाडीवाला

२७ **स** (ति. लिं.) उ०—डोळस, हाडस

२८ **ळ** (ति. लिं.) उ०—गाठळ, रवाळ

**प्रकार दुसरा—सदृश** या अर्थी प्रत्यय—

१ **आ** ( वि० ) उ०—कापशा, गाजरा

२ **आळ** ( ति. लिं. ) उ०—गोंडाळ, पिठाळ

३ **ई** ( ति. लिं. ) उ०—अंजिरी, केशरी

४ **ट** ( ति. लिं. ) उ०--चिकट, शोपट

५ **ड** ( ति लिं. ) उ०—बोजड

६ **डा** ( वि० ) उ०—तुसडा.

७ **या** ( वि० ) उ०--साखऱ्या, शेंदऱ्या.

८ **वाणा** ( वि० ) उ०—केविलवाणा, दीनवाणा.

९ **ळ** ( ति० लिं०) उ०--ढगळ.

**प्रकार तिसरा—पालक** या अर्थी प्रत्यय—

१ **कर** (ति० लिं०) उ०—गाडेकर, वेसकर.

२ **करी** (ति० लिं०) उ०—गडकरी, महालकरी.

३ **दार** (ति० लिं०) उ०—मामलेदार, सुभेदार.

४ **वळ** (ति० लिं०) उ०—गंगावळ, प्रयागवळ.

५ **वळा** (वि०) उ०—कोठवळा.

६ **वाला** (वि०) उ०—गाडीवाला, घोडेवाला.

**प्रकार चवथा—धंदा करणारा** या अर्थी प्रत्यय—

१ **आडी** (ति० लिं०) उ०—नावाडी, सोंगाडी.

२ **आड्या** (ति० लिं०) उ०—वाटाड्या, सोंगाड्या.

३ **आर** (पु०) उ०—लोहार, सोनार.

४ **आरी** (पु०) उ०—चितारी, पुजारी.

५ **कर** (पु०) उ०—अड्डेकर, गाडेकर.

६ **करी** (पु०) उ०—कथेकरी, मोलकरी.

७ **गर** (पु०) उ०—जिनगर, सौदागर.

८ **गार** (पु०) उ०—खिजमतगार, रफूगार.

९ **गीर** (पु०) उ०—खोदगीर, तमासगीर.

१० **नीस** (पु०) उ०—पोतनीस, फडणीस.

**प्रकार पांचवा—करणारा** या अर्थी प्रत्यय—

१ **आ** (ति० लिं०) उ०—राखणा.

२ **आळू** (ति० लिं०) उ०—दयाळू, सोसाळू.

३ **क** (ति० लिं०) उ०—जाचक, ढाळक.

४ **कर** (पु०) उ०—खोडकर, यात्रेकर.

५ **करी** (पु०) उ०—कामकरी, सेवेकरी.

६ **खोर** (ति० लिं०) उ०--तकरारखोर, तंटेखोर.
७ **गार** (ति० लिं०) उ०—गुन्हेगार, मदतगार.
८ **दार** (ति० लिं०) उ०—अर्जदार, मोजणीदार.
९ **नीस** (ति० लिं–) उ०—मदतनीस.
१० **रा** (ति० लिं०) उ०--खाजरा, नाचरा.
११ **वाला** (वि०) उ०--फेरीवाला, बंडवाला.

**प्रकार सहावा–संबंधी** या अर्थी प्रत्यय.—
१ **ई** (ति० लिं०) उ०--जंगली, देशी.
२ **ईल** (ति० लिं०) उ०–मधील, शेवटील.
३ **चा** (वि०) उ०--अंगचा, पाठचा.
४ **ला** (वि०) उ०--मधला, शेवटला.
५ **वाईक** (ति० लिं) उ०--आठवडेवाईक, आस्थवाईक
६ **वार** (ति० लिं) उ०—पद्धतवार, मुदतवार
७ **शीर** (ति० लिं०) उ०—अदबशीर, कायदेशीर

**प्रकार सातवा–योग्य** ह्या अर्थी प्रत्यय—
१ **आऊ** (ति० लिं)–उ०--आहेराऊ, कुणबाऊ—
२ **ई** (ति० लिं०)–आहेरी, गृहस्थी
३ **करी** (पु०) उ०—मानकरी
४ **सर, सार** (ति० लिं०) उ०–आटपसर, आटपसार

**प्रकार आठवा--व्यसनी** या अर्थी प्रत्यय—
१ **बाज** (ति० लिं०) उ०—दारूबाज, रंडीबाज
२ **या** (पु०) उ०--भांग्या, रांड्या

**प्रकार नववा–देणारा** या अर्थी प्रत्यय—
१ **कर** (ति० लिं०) उ०--देणेकर, भाडेकर.

२ **करी** (ति० लिं०) उ०--देणेकरी, भाडेकरी.

३ **दार** (ति० लिं०) उ०--खंडणीदार, जबाबदार.

**प्रकार दहावा--राहणारा** या अर्थी प्रत्यय--

१ **कर** (पु०) उ०--काशीकर, वाईकर.

२ **करी** (ति० लिं०) उ०--गांवकरी, पेटकरी.

**प्रकार अकरावा--मूलद्रव्यबोधक** प्रत्यय--

१ **ई** (ति० लिं०) उ०--दगडी, बेगडी.

**प्रकार बारावा--गुणित** या अर्थी प्रत्यय.--

१ **णा** (वि) उ०--दुणा.

२ **पट** (ति० लिं०) उ०--एकपट, दसपट.

**प्रकार तेरावा--रंगविलेलें** या अर्थी प्रत्यय--

१ **ई** (ति० लिं०) उ०--कुसुंबी, केशरी.

**प्रकार चवदावा--वेष्टित** या अर्थी प्रत्यय--

१ **ई** (ति० लिं०) उ०--कापडी, बुरखी.

## विशेषणसाधित विशेषणें.

१७२ विशेषणसाधित विशेषणें हीं पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात:--

**प्रकार पहिला--संबंधी** या अर्थी प्रत्यय--

१ **उळ** (वि०) उ०--बारुळें, सोळुलें.

२ **ओळ** (वि०) उ०--सातोळें, आठोळें (आठ महिन्याचें मूल.)

**टीप**--हे प्रत्यय संख्याबोधक विशेषणास लागतात.

**प्रकार दुसरा--स्वार्थी** प्रत्यय--

१ **आट** किंवा **आड** (ति० लिं०) उ०--उंचाट, उंचाड.

२ आरा (वि० ) उ०--सोपारा.

३ का (वि० ) उ०--थोडका, रोडका, परका.

४ की (ति० लिं० ) उ०--परकी.

५ ट (ति० लिं० ) उ०--चोखट.

६ ता (वि० ) उ०--परता.

७ र (ति० लिं० ) उ०--ताठर.

८ वा (वि० ) उ०--बरवा.

९ वट (ति० लिं० ) उ०--एकवट.

१० स (ति० लिं० ) उ०--खुलास.

११ ळ (ति० लिं० ) उ०--फुटकळ.

**प्रकार तिसरा—न्यूनत्वबोधक** प्रत्यय--

१ ऊस (ति० लिं० ) उ०--तांबूस.

२ एला (वि० ) उ०--काळेला.

३ का (वि० ) उ०--पांढुरका.

४ कट (ति० लिं० ) उ०--पांढुरकट.

५ गा (वि० ) उ०--पांढुरगा.

६ गेला (वि० ) उ०--काळगेला.

६ ट (ति० लिं० ) उ०--नवट, पिवळट.

७ लंड (ति० लिं० ) उ०--अदलंड, मधलंड.

८ सट (ति० लिं० ) उ०--भोळसट.

९ सर (ति० लिं० ) उ०--ओलसर, काळसर.

**प्रकार चवथा—अधिक** या अर्थी प्रत्यय—

१ ओडा (वि० ) उ०—लांबोडा.

२ ओत्रा (वि० ) उ०—एकोत्रा, दुहोत्रा.

३ ट ( ति० लिं० ) उ०--जुनाट.

४ ड ( ति० लिं० ) उ० जखड.

प्रकार पांचवा—कुत्सित या अर्थी प्रत्यय—

१ ट ( ति० लिं० ) उ०--खुजट.

२ डा ( वि० ) उ०--म्हातारडा.

३ रा ( वि० ) उ०--महागरा.

प्रकार सहावा—क्रमबोधक प्रत्यय—

१ जा ( वि० ) उ०--दुजा, तिजा.

२ था ( वि० ) उ०--चवथा.

३ रा ( वि० ) उ०—दुसरा, तिसरा.

४ वा ( वि० ) उ०— पांचवा, विसावा.

## धातुसाधित विशेषणें.

१७३ धातुसाधित विशेषणें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात —

प्रकार पहिला—कर्तृबोधक प्रत्यय—

१ अ ( पु० ) उ०—नट, हेर.

२ आ ( वि० ) उ०--नवशिका, लंगडा.

३ आऊ ( ति० लिं० ) उ०--लढाऊ.

४ आड्या ( पु० ) उ०--मापाड्या.

५ आर ( ति० लिं० ) उ०--लुटार.

६ आरी ( ति० लिं० ) उ०--ओतारी, मापारी.

७ आरू ( ति० लिं० ) उ०—चुकारू, लुटारू.

८ आळ ( ति० लिं० ) उ०--भांडाळ.

९ ईक ( ति० लिं० ) उ०--खर्चीक, सोशीक.

१० **ईत** (ति०लिं०) उ०--चकचकीत, लकलकीत.

११ **ईर** ( ति० लिं० ) उ०--फुटीर.

१२ **ईल** ( ति० लिं० ) उ०--अडील.

१३ **ऊ** ( ति० लिं० ) उ०--काढू, मारू.

१४ **एरा** ( वि० ) उ०--बोचेरा.

१५ **एल** ( ति० लिं० ) उ०--अडेल.

१७ **का** (वि०) उ०--जळका, रडका.

१८ **णा** (वि०) उ०--जीवघेणा.

१९ **णारा** (वि०) उ०--चालणारा, बोलणारा.

२० **ण्या** (पु०) उ०--जीवघेण्या.

२१ **ता** (पु०) उ०--तरता, मारता.

**टीप**---प्रयोज्यार्थक धातूंना **ता** प्रत्यय जोडिला असतां ऱ्हस्व **इ** आगम होतो. उ०--खेळविता, शिकविता इ०.

२२ **दाड** (ति० लिं०) उ०--खादाड.

२३ **बू** (ति० लिं०) उ०--खाबू.

२४ **या** (वि०) उ०--उचल्या, लाव्या.

२५ **रा** (वि०) उ०--नाचरा, लाजरा.

२६ **ल्या** (वि०) उ०--जागल्या.

२७ **वा** (वि०) उ०--रडवा.

२८ **वय्या** (पु०) उ०--गवय्या, लढवय्या.

२९ **स** (ति० लिं०) उ०--अडस.

**प्रकार दुसरा--कर्मबोधक** प्रत्यय---

१ **अ** (ति० लिं०) उ०--खरड, भरड.

२ **आ** (पु०) उ०--ठेवा, भरडा.

३ **आईत** (ति० लिं०) उ०--चढाईत.

४ **आर** (ति० लिं०) उ०--तुटार.

५ **आरू** (ति० लिं०) उ०--चुकारू (चुकलेलें).

६ **ईक** (ति० लिं०) उ०--सडीक, पढीक.

७ **ईत** (ति० लिं०) उ०--पडीत, विस्कळीत.

८ **ईर** (ति० लिं०) उ०--फुगीर, फुटीर.

९ **ईल** (ति० लिं०) उ० छापील, डागील.

१० **ईव** (ति० लिं०) उ०--आटीव, पाळीव.

११ **ऊट** (ति० लिं०) उ०--पिकूट.

१२ **ऊर** (ति० लिं०) उ०--चुकूर.

१३ **ऊस** (ति० लिं०) उ०--आंबूस.

१४ **एल** (ति० लिं०) उ०--चढेल.

१५ **का** (वि०) उ०--कुचका.

१६ **कुंजा** (वि०) उ०--वाळकुंजा.

१७ **ट** (ति० लिं०) उ०--कुजट, सुकट.

१८ **ता** (वि०) उ०--चुकता.

१९ **ला** (वि०) उ०--दिला, तापला.

२० **लेला** (वि०) उ०--केलेला, पाहिलेला.

२१ **वा** (ति० लिं०) उ०--धुवा.

**टीप**--(अ) हे प्रत्यय अकर्मक धातूंहून कर्तरि होतात.

(इ) भूतकालाच्या पहिल्या प्रकारचे प्रत्यय लागतांना धातूंस व धातु व प्रत्यय ह्या दोहोंमध्यें जीं कार्यें होतात तींच **ला** व **लेला** हे प्रत्यय जोडितांना होतात.

**प्रकार तिसरा--उद्देशार्थी** प्रत्यय—

१ **आवा** (वि०) उ०--करावा.

२ **णारा** (वि०) उ०--करणारा.

**प्रकार चवथा--योग्यार्थी** प्रत्यय—

१ **आऊ** (ति० लिं०) उ०--जळाऊ, टिकाऊ.

२ **आवा** (वि०) उ०--पहावा.

३ **णा** (वि०) उ०--देखणा.

४ **णाऊ** (ति० लिं०) उ०--ठेवणाऊ, खाणाऊ.

## अव्ययसाधित विशेषणें.

१७४ अव्ययसाधित विशेषणें पुढील प्रत्यय लागून होतात व हीं बहुशः **संबंधबोधक** असतात.—

१ **अचा** उ० (वि०) उ०--एथचा, तेथचा.

२ **अला** (वि०) उ०--पुढला, मागला.

३ **अस** (ति० लिं०) उ०--आगस, मागस.

४ **ईल** (ति० लिं०) उ०--पुढील, मागिल.

५ **चा** (वि०) उ०--पूर्वीचा, उद्यांचा.

६ **वा** (वि०) आडवा, तिडवा

**टीप**--स्वरादि प्रत्यय पररूपसंधीनें लागतात.

## नामसाधित धातु.

१७५ नामसाधित धातु पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात.—

**प्रकार पहिला--करणें** किंवा **होणें** या अर्थी प्रत्यय—

१ **कळ** उ०--मुटकळ, मुठकळ.

२ **प** उ०--कोळप (कोळ किंवा राख होणें)

३ ल उ०--बोंबल

४ ळ उ०--साकळ.

**प्रकार दुसरा--युक्त करणें** किंवा **होणें** या अर्थी प्रत्यय—

१ **अ** उ० दूण

२ **अर** उ०--पिसट.

३ **अड** उ०--चिरमड.

४ **अळ** उ०--चिघळ.

५ **आर** उ०--गोफाट (गुंतागुंतींत सांपडणें), चोंदाट.

६ **आड** उ०--चोंदाड.

७ **आव** उ०--आळसाव.

८ **आळ** उ०--फेसाळ.

९ **एज** उ०--भुकेज.

१० **मट** उ०--घसमट, चुरमट.

११ **ल** उ०--पोंचल.

१२ **वट** उ०--घसवट, चुरवट.

१३ **स** उ०--धुमस.

**प्रकार तिसरा--पीडित होणें** किंवा **करणें** या अर्थी प्रत्यय—

१ **अ** उ०--कानस, ढाळ, थोबाड.

२ **आर** उ०--मुताट (मुतानें त्रास पावणें).

३ **आव** उ०--वाराव (वाऱ्यानें सुकणें).

४ **आळ** उ०—दाताळ (कुरतडणें), पिसाळ.

५ **क** उ०—मुटक (मुठीनें मारणें किंवा पिळणें).

६ ट उ०—शिंगट (शिंगानें घासणें).

७ ड उ०—लाथड, लाथाड.

८ व उ०—सठव (जन्मल्यापासून सहाव्या दिवशीं सठवाईची बाधा होणें).

९ ळ उ०—पिसळ.

**प्रकार चवथा— नाहींसें करणें** ह्या अर्थीं प्रत्यय—

१ **अ** उ०—साळ (साल नाहींशी करणें).

२ **ड** उ०—बोखड, बोखाड, (डिकशा नाहींशा करणें).

३ **स** उ०—तळस, तळास (तळापासून नाहींसें करणें).

**प्रकार पांचवा—सदृश होणें** किंवा **करणें** ह्या अर्थीं प्रत्यय—

१ **आळ** उ०—माणसाळ.

२ **र** उ०—दांडार.

**प्रकार सहावा—आंत घालणें** ह्या अर्थीं प्रत्यय—

१ **आव** उ०—डोकाव.

२ **क** उ०—शिरक.

**प्रकार सातवा—विणें** या अर्थीं प्रत्यय—

१ **अ** उ०—बुधवार.

## विशेषण साधित धातु.

१७८ विशेषण साधित धातु पुढील अर्थीं व पुढील प्रत्यय लागून होतात---

**प्रकार पहिला--करणें** किंवा **होणें** या अर्थी प्रत्यय--

१ **अ** उ०--आखूड, गढूळ.

२ **अव** उ०--ओलव.

३ **आड** उ०--उंचाड (उंच होणें), बुचाड (बुचा करणें).

४ **आव** उ०--आमटाव.

५ **व** उ०--आडव.

६ **वट** उ०--काळवट.

७ **वंड** उ०--काळवंड.

८ **ळ** उ०--चोखळ.

**प्रकार दुसरा--पीडित होणें** किंवा **करणें** या अर्थी प्रत्यय----

१ **आड** उ०--लुचाड, लुबाड.

**धातु साधित धातु.**

१७७ धातुसाधित धातु दोन प्रकारचे आहेत, **प्रयोज्यार्थक** आणि **शक्यार्थक.**

१७९ धातूचा अर्थ जो व्यापार तो करावयाला लावणें असा ज्या धातुसाधित धातूचा अर्थ होतो त्यास **प्रयोज्यार्थक** धातु ह्मणावें. हे धातु पांच रीतींनीं झालेले आढळतात.—

**रीति पहिली**--(अ) **ठे** हा धातु व अनेकाक्षरी धातु ह्यांना **व** आणि **ठे** शिवाय इतर एकाक्षरी धातूंना **वव** हे प्रत्यय लागतात, आणि हकारान्त धातूंना **व** किंवा **वव** प्रत्यय विकल्पें लागतो. तसेंच **व** लागत

असल्यास **व**च्या मागें आणि **वव** लागत असल्यास **वव** ह्यांच्या मध्यें **ई** आगम क्वचित् विकल्पें होतो. उ० ठेव, करव, घेवव, करीव, घेवीव इ०

( इ ) कित्येक धातूंस **व** प्रत्ययापूर्वी **ई** व **आ** हे दोन्ही आगम विकल्पें होतात. उ०—फितव, फितीव, फिताव इ०

( उ ) अनुकरणवाचक अकर्मक धातूंस **व** प्रत्यय लागतांना **आ** आगम होतो. उ०—गटगटाव, खुळखुळाव इत्यादि

**टीप**—स्वरादि आख्यात प्रत्यय जोडितांना **ई** व **आ** हे आगम होत नाहींत. उ०--फितवावें, करवावें इ०

**रीति दुसरी—फूट** वगैरे कांहीं धातूंच्या आद्य-स्वरास गुण व उपांत्य व्यंजनास त्याच्या स्थानचा तिसरा वर्ण होतो. उ०--**फूट**-फोड, तूट-तोड, सूट-सोड, फीट-फेड, खूट-खोड इ०

**रीति तिसरी— सर** वगैरे कांहीं धातूंच्या आद्य-स्वरास वृद्धि आणि उपांत्य व्यंजनास त्याच्या स्थानचा तिसरा वर्ण होतो. उ०--सर-सार, मर-मार, तर-तार, पड-पाड, फाट-फाड, इ०

**रीति चवथी—रूप** वगैरे धातूंच्या आद्य स्वरास क्वचित् सानुनासिक गुण आणि उपांत्य व्यंजनास **व्** आदेश होतो. उ०—रूप-रोंव, गुंफ-गोंव, खूप-खोंव, लाग-लांव इ०

**रीति पांचवी**—मावळ ह्याचें **मालव**, देख ह्याचें **दाखव**, पी ह्याचें **पाज** किंवा **पिवव** आणि भी धातूंचें **भेडाव** किंवा **भिवव** अशीं रूपें होतात.

**टीप**—कांहीं धातु रूपांवरून प्रयोज्यार्थक आहेत असे वाटतात; परंतु अर्थावरून पहातां ते तसे नाहींत. उ०--काढ, पेट, लोट, पाठीव, बडव, माव, सोकाव इ०

१७९ प्रयोज्यार्थक धातूंवरून पुन्हा प्रयोज्यार्थक धातु कर्तव्य असतां, मूळ धातूंस **व** प्रत्यय जोडिलेला नसेल तर **व** जोडावा आणि एक **व** जोडिलेला असेल तर आणखी एक नवा **व** जोडावा; परंतु जेथें दोन **व** जोडिले असतील तेथें नवा **व** जोडूं नये. ही परंपरा अनेक संख्येपर्यंत चालेल पण **व**ची संख्या दोहोंपर्यंतच वाढते. उ०--पाड-पाडव, पाडवव; कर-करव, करवव इ०

१८० धातूचा अर्थ जो व्यापार तो करण्याची शक्ति आहे असा ज्या धातुसाधित धातूचा अर्थ होतो त्यास **शक्यार्थक** धातु ह्मणावें. हे धातु दोन रीतींनीं झालेले आढळतात.—

**रीति पहिली**—अनेकाक्षरी धातूंना **व** आणि एकाक्षरी व हकारांत धातूंना **वव** प्रत्यय लागतो. उ०—करव, घेवव, राहवव इ०.

**रीति दुसरी**— धातूंना वेगळा प्रत्यय न लागतां मुळचेच धातु शक्यार्थी होतात. उ०— ‘ बायका जोंधळे दळतात ’; ‘ बायकांना जोंधळे दळतात ’—येथें पहिल्या वाक्यांत फक्त **दळण्याची क्रिया** दर्शविली

आहे व दुसऱ्या वाक्यांत बायकांच्या आंगची जोंधळे **दळण्याची शक्ति** दाखविली आहे. मला हरभरे चावतात; त्याला तुळई उचलते; मला खुंटा बसतो; मला ही घूस मरत नाहीं; मला दोरी तुटत नाहीं. शेवटच्या तीन उदाहरणांत **बस, मर** व **सूट** हे धातु मुळचे अकर्मक असतां सकर्मक झाले आहेत.

**टीप**—( **अ** ) शक्यार्थक धातूंस आख्यातप्रत्यय अकर्मकाप्रमाणें लागतात. उ०--दळेल, करवेल इ०

( इ ) शक्यार्थक धातूंस आख्यातप्रत्यय जोडितांना **इ** आगम होत नाहीं. उ०--करवतें मारवतें इ०

## अव्यय साधित धातु.

१८१ अव्यय साधित धातु **होणें** या अर्थी पुढील प्रत्यय लागून होतात —

१ **आव** उ०—खालाव, दुराव ( दूर होणें ).

२ **स** उ०—आगस, मागस ( मागाहून होणें ).

## नामसाधित अव्ययें.

१८२ नामसाधित अव्ययें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात.—

**प्रकार पहिला—तृतीया विभक्त्यर्थक** प्रत्यय--

१ **आ** उ०—द्वारा, बुध्या.

२ **ऊन** उ०—आंगून, कडून.

३ **ए** उ०—कडे, वाटे.

४ **एं** उ०—द्वारें, मुळें.

**प्रकार दुसरा—चतुर्थ्यर्थक** प्रत्यय—

१ **एं** उ०—कारणें.

**प्रकार तिसरा—पंचम्यर्थक** प्रत्यय—

१ **ऊन** उ०—कडून, पासून, मधून.

**प्रकार चवथा—सप्तम्यर्थक** प्रत्यय—

१ **आं** उ०—उदयां ( उद्यां ).

२ **ई** उ०—रस्तोरस्तीं.

३ **ईक** उ०—उदईक, उदयीक.

४ **ए** उ०—कडे.

५ **एं** उ०—मध्यें.

६ **कर** उ०—लवकर ( लौकर ).

७ **शीर** उ०—वक्तशीर.

## विशेषणसाधित अव्ययें

१८३ विशेषणसाधित अव्ययें पुढील अर्थी व पुढील प्रत्यय लागून होतात, आणि पाहिले तीन प्रकारचीं अव्ययें विशेषणापासून झालेलीं आहेत व बाकीचीं सर्वनामांपासून होतात.

**प्रकार पाहिला- स्थितिबोधक** प्रत्यय-

१ **नें** उ०—उभ्यानें, मोठयानें.

**प्रकार दुसरा--संग्रहबोधक** प्रत्यय-

१ **ऊन (ऊण)** उ०—एकून (एकूण).

**प्रकार तिसरा—वियोगबोधक** प्रत्यय.

१ **ऊन** उ०—मधून ( अधून मधून ) लांबून.

**टीप**—हा प्रत्यय केव्हां केव्हां स्वार्थीही होतो. उ०—बळकटून.

**प्रकार चवथा—स्थलबोधक** प्रत्यय.—

१ **एं** उ०—कैं, जैं, तैं,

२ **ठें**—उ०—कोठें (कुठें)

**टीप—ठें** प्रत्यय **क** ह्या सर्वनामास लागतो व तो लागला असतां सर्वनाम ओकारान्त किंवा उकारान्त होतें.

३ **थें** उ०—एथें, जेथें, तेथें. (इथें, जिथें, तिथें).

**टीप—थें** प्रत्यय **अ, ज, त** ह्या सर्वनामांस लागतो व तो जोडिला असतां सर्वनाम एकारान्त किंवा इकारान्त होतें.

४ **स** उ०—आसपास, ऐसपैस.

**टीप—स** प्रत्यय हा **अ** व **पर** ह्या सर्वनामांस लागतो व तो लागला असतां **अला आ** किंवा **ऐ** आणि **पर** ह्यास **पा** किंवा **पै** असे आदेश होतात.

**प्रकार पांचवा—कालबोधक** प्रत्यय---

१ **अंव** उ०—जंव, तंव.

**टीप**—हा प्रत्यय **ज** आणि **त** ह्या सर्वनामांस पररूप संधीनें लागतो.

२ **एं** उ०—कैं, जैं, तैं.

**टीप---एं** हा प्रत्यय **क, ज,** आणि **त** ह्या सर्वनामांस पररूप संधीनें लागतो.

३ **ओं** उ०—जों, तों.

**टीप—ओं** प्रत्यय **ज** आणि **त** ह्या सर्वनामांस पर-रूप संधीनें लागतो.

४ **धवां** उ०—एधवां, केधवां, जेधवां, तेधवां.

**टीप—धवां** प्रत्यय **अ, क, ज, त** ह्या सर्वनामांस लागतो, तेव्हां सर्वनाम एकारान्त होतें.

५ **धीं** उ०—अधीं, कधीं, जधीं, तधीं.

**टीप—धीं** हा प्रत्यय **अ, क, ज, त** ह्या सर्वनामांस लागतो,

६ **व्हां** उ०—एव्हां, केव्हां, जेव्हां, तेव्हां.

**टीप—व्हां** हा प्रत्यय **अ, क, ज, त** ह्या सर्वनामांस लागतो.

**प्रकार सहावा—व्यक्तिबोधक** प्रत्यय—

१ **तां** उ०—उभयतां, स्वतां.

२ **तः** उ०—उभयतः, स्वतः.

**प्रकार सातवा—दिवसार्थी** प्रत्यय—

१ **वां** उ०—एरवां, तेरवां, परवां.

**प्रकार आठवा—पक्षार्थी** प्रत्यय—

१ **र** उ०—जर, तर.

२ **री** उ० जरी, तरी.

३ **न्ही** उ०—जन्ही, तन्ही.

४ **वीं** उ०—एवीं, एरवीं, जेवीं, तेवीं केवीं,

५ **व्हीं** उ०—एव्हीं, तेव्हीं.

**टीप—वीं, व्हीं** प्रत्यय **अ, त, ज, क** ह्यांस लागतो, आणि तो लागला असतां सर्वनामें एकारांत होतात.

**प्रकार नववा—शक्तिबोधक** प्रत्यय—

१ **म** उ०—जेम, तेम.

**टीप**—**म** हा प्रत्यय **ज** आणि **त** ह्यांस लागतो, व तीं सर्वनामें एकारान्त होतात.

**प्रकार दहावा—कारणबोधक** प्रत्यय—

१ **आं** उ०—आं, कां.

**टीप**—हा प्रत्यय **अ** व **क** ह्या सर्वनामांस लागतो.

### १८४ धातुसाधित अव्ययें.

**प्रकार पहिला—वर्तमानकालवाचक** प्रत्यय—

१ **त** उ०—करीत, बांधीत, जात.

२ **तां** उ०—करितां, बांधितां, जातां.

३ **तांना** उ०—करितांना, बांधितांना, जातांना.

**टीप**—( **अ** ) **त** प्रत्ययापूर्वी सकर्मक धातूंस दीर्घ **ई** आगम होतो व त्या आगमापूर्वी धातूच्या अंत्य स्वराचा लोप होतो. उ०—करीत, लिहीत, मारीत इ०.

( **इ** ) **आचरादि** गणांतील पाहिले दहा धातूंस हा आगम विकल्पानें होतो. उ०—आठवीत-आठवत.

( **उ** ) **उमजादि** धातु, लिह खेरीज हकारान्त धातु, सांग, माग, बघ, चढ, खेळ, पढ हे धातु व एकाक्षरी धातु यांस हा आगम होत नाहीं. उ०—पढत, पोहत, बोलत इ०.

( **ऋ** ) **त** प्रत्ययाबद्दल कित्येक जागीं **ता** येऊन तो कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें बदलतो, व ते वेळेस दीर्घ **ई** आगमाबद्दल ऱ्हस्व **इ** आगम होतो. उ०—करिता, करिती, करितें इ०.

( ऌ ) **त** प्रत्ययान्तापूर्वी ज्या धातूंस दीर्घ **ई** आगम होतो, त्या धातूंस **तां** व **तांना** हे प्रत्यय जोडितांना ऱ्हस्व **इ** आगम होतो. उ०—करितां, करितांना, लिहितां, लिहितांना इ०.

**प्रकार दुसरा—भूतकालवाचक** व **वर्तमानकालवाचक** प्रत्यय—

१ **ल्या** उ०—तो उठल्याबसल्या रागें भरतो; केल्याकेल्या अंतर आहे.

**प्रकार तिसरा—भूतकालवाचक** प्रत्यय—

१ **ऊन** उ०—करून, बसून.

**प्रकार चवथा—उद्देशार्थी** प्रत्यय—

१ **ऊं** उ०—करूं, देऊं.

### अव्ययसाधित अव्ययें.

१८५ अव्ययसाधित अव्ययें **वियोगार्थी** पुढील प्रत्यय लागून होतात.

१ **ऊन** उ०—दुरून, येथून, कोठून.

**टीप**—ह्या प्रत्ययांपूर्वी अनुस्वारसहित अंत्यस्वराचा किंवा केवळ अंत्यस्वराचा लोप होतो.

---

# साधित शब्द विचार.

## सामासिक शब्दविचार.

१८६ परस्पराशीं संबंध असणाऱ्या दोन किंवा अधिक शब्दांतील संबंधदर्शक शब्द किंवा विभक्तिप्रत्यय

यांचा लोप होऊन त्या अनेक शब्दांचा एकार्थबोधक जो एक शब्द होतो त्यास **सामासिक शब्द** ह्मणतात व अशा रीतीनें त्यांच्या एकत्र होण्याला **समास** ह्मणतात.

**टीप**—( अ ) सामासिक शब्दांतील शेवटच्या शब्दांस विभक्तिप्रत्यय प्रायः लागतात, व मागील शब्द पुढील शब्दाशीं संधिनियमाप्रमाणें जोडिले जातात.

( इ ) मराठी भाषेंत दोन शब्दांचाच समास बहुधा आढळतो; परंतु संस्कृतांत दोहोंतून जास्त शब्दांचाही समास होतो.

१८७ सामासिक शब्दाच्या अर्थाची फोड करून दाखविणाऱ्या शब्दसमुदायास **विग्रह** असें ह्मणतात. जसें--साखरभात ह्या सामासिक शब्दाचा विग्रह 'साखरेनें युक्त जो भात तो' असा होतो. राजवाडा ह्याचा विग्रह 'राजाचा जो वाडा तो' असा होतो. सुकाळ ह्याचा विग्रह 'सु ह्मणजे चांगला जो काळ तो' असा आहे.

१८८ अर्थसंबंधानें शब्दांच्या प्राधान्यावरून समासांचे मुख्य प्रकार चार आहेत,--**अव्ययीभाव, तत्पुरुष, द्वंद्व,** व **बहुव्रीहि.**

**टीप**—अव्ययीभाव समासांत पूर्वपदाचा अर्थ प्रायः प्रधान असतो, तत्पुरुष समासांत उत्तर पदाचा अर्थ प्रायः प्रधान असतो, द्वंद्व समासांत दोन्ही पदांचा अर्थ किंवा दोन्हीपदांच्या अर्थाचा समाहार प्रधान असतो, आणि बहुव्रीहि समासांत दोन्ही पदांहून इतर पदाचा अर्थ प्रधान असतो, ह्मणून तो तो शब्द प्रधान समजावा.

१८९ ज्या समासांत पहिला शब्द अव्यय असून तो प्रधान असतो व दुसरा शब्द नाम किंवा विशेषण असतें त्यास **अव्ययीभाव** समास ह्मणतात, व सामासिक शब्द अव्यय होतो. उ०—यथाशक्ति—येथें **यथा** शब्दाचा अर्थ प्रधान आहे, व एकंदर शब्द **अव्यय** आहे. समक्ष, आमरण, बिनधोक, बरहुकुम, दररोज, हरजिन्नस, यथायुक्त, यथायोग्य, हरवक्त, दरमजल इत्यादि.

**टीप**---(अ) कधीं कधीं अव्ययीभाव समासास तृतीया व सप्तमी विभक्तींचे एकवचनीं प्रत्यय लागतात. उ० यथाज्ञानें, यथाकाळीं इ०.

(इ) रस्तोरस्तीं, जागोजाग, घरोघर इत्यादि उदाहरणांत प्रथम शब्द **प्रति** ह्या अव्ययाबद्दल योजिला आहे, ह्मणून येथें अव्ययीभाव समास मानिला असतां चालेल.

### तत्पुरुष.

१९० ज्या समासांत दुसरा शब्द प्रधान असतो, त्याला **तत्पुरुष** समास ह्मणतात. उ०—राजपुरुष—एथें पुरुष शब्दाचा अर्थ प्रधान आहे.

१९१ तत्पुरुष समासाचे **व्यधिकरण** तत्पुरुष व **समानाधिकरण** तत्पुरुष असे दोन भेद आहेत.

१९२ ज्यांच्या विभक्ति निरनिराळ्या आहेत अशा शब्दांचा तत्पुरुष समास कर्तव्य असतां त्यास **व्यधिकरण तत्पुरुष** ह्मणतात, व ज्यांची विभक्ति एकच आहे

अशा शब्दांचा समास कर्तव्य असतां त्यास **समानाधिकरण तत्पुरुष** किंवा **कर्मधारय** ह्मणतात.

१९३ व्यधिकरण तत्पुरुषांत पहिल्या शब्दाला प्रथमादि विभक्तींपैकीं जी विभक्ति विग्रह करितांना लागते तीवरून ह्या समासाचे सहा प्रकार करितात.

( अ ) **प्रथमा तत्पुरुष** उ०—आगलाव्या, पोटभरू, तोंडपुजा, वाघमाऱ्या, घरमोड्या इ०.

( इ ) **तृतीया तत्पुरुष** उ०—उपासमर, कोंडमारा, आतेभाऊ, चुलतभाऊ, गजमोजणी इ०.

( उ ) **चतुर्थी तत्पुरुष** उ०—पोळपाट, चोळखण, आतेचीर, मामेचीर, इ०.

( ऋ ) **पंचमी तत्पुरुष** उ०—चोरभय, ऋणमुक्त, जातिभ्रष्ट, रोगमुक्त.

( ऌ ) **षष्ठी तत्पुरुष** उ०—राजवाडा, केळफूल, फणसपोळी, शेणसडा, चोरगल्ली, मायपोट, सुतारकाम इ०.

( ए ) **सप्तमी तत्पुरुष** उ०—पाणकोंबडा, वनगाय, रानडुकर, घरजांवई इ०.

**टीप**--( अ ) **उपपद समास** ह्मणून निराळा एक तत्पुरुषाचा प्रकार आहे, व त्यांत दुसरा शब्द कर्तृवाचक धातुसाधित असतो. उ०--गृहस्थ, ग्रंथकार, कुंभकार, शेषशाई इ०.

( इ ) तत्पुरुष समासांत कधीं कधीं पहिल्या शब्दाच्या विभक्तीचा लोप होत नाहीं, तेव्हां त्यास **अलुक्समास**

ह्मणतात. उ०--पाखरेविक्या, आत्मनेपद, वाचस्पति, युधिष्टिर, कर्तरिप्रयोग इ०.

(उ) कधीं कधीं तत्पुरुष समासांत पहिले पदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप होऊन सामान्यरूप तसेंच रहातें, तेव्हां **अलुक्** समास मानिला असतां चालेल, उ०—रामाकरीं, डोंबाघरीं, पिशाचाहातीं इ०.

(ऋ) सारखा, जोगा, वेगळा इत्यादि अव्ययें जोडून झालेले शब्द मराठींत **अलुक्** समासाचीं उदाहरणें मानिलीं असतां चालेल, येथें विशेष इतकाच कीं पहिलें पद सामान्यरूपयुक्त आहे.

(ऌ) भयंकर, भुजंग, पुरंदर, धनंजय, इत्यादि शब्द **अलुक्** समासासारखे वाटतात; परंतु त्यांत दिसणारा अनुस्वार विभक्तिप्रत्यय नसून आगम आहे.

(ए) शब्दापूर्वी **नञ्** अव्यय लागून **नञ् तत्पुरुष** समास होतो. व्यंजनादि शब्द पुढें असतां **नञ्** ह्याचें **अ** असें रूप होतें व स्वरादि शब्द पुढें असतां **अन्** असें रूप होतें. उ०—नञ्+योग्य=अ+योग्य=अयोग्य. नञ्+आदर=अन्+आदर=अनादर इ०

१९४ समानाधिकरण तत्पुरुषांत विशेष्यविशेषणभाव व उपमानोपमेयभाव असतो, ह्मणून त्याचे प्रकार दोन होतात,—**विशेष्यविशेषणभावबोधक** व **उपमानोपमेयभावबोधक.**

१९५ विशेष्यविशेषणभावबोधक कर्मधारयाचे सात प्रकार आहेत—

१ **विशेषणपूर्वपद** उ०—तांबडमाती, काळमांजर इ०

२ **विशेषणोत्तरपद** उ०—दालचिनी, भाषांतर, देशांतर ( अन्य देश ).

३ **विशेषणोभयपद** उ०—दृष्टादृष्ट, कृताकृत, काळ-सांवळा, पढतमूर्ख इ०

४ **विषयपूर्वपद** उ०—देवबुद्धि ( देवविषयक ह्मणजे देव आहे अशी बुद्धि ), घटशब्द ( घट असा शब्द ).

५ **अव्ययपूर्वपद** उ०—स्वल्प, दुर्व्यसन, सुवासना इ०

६ **द्विगु** उ०—पंचवटी, अष्टाध्यायी, पंचपाळें इ०

**टीप**—ज्या कर्मधारयांत पहिलें पद संख्याबोधक विशेषण असतें व सामासिक शब्दापासून समाहाराचा ( समुदायाचा ) बोध होतो त्यास **द्विगु** ह्मणतात. हा समास बहुधा नपुंसकलिंगी किंवा स्त्रीलिंगी व एकवचनीं असतो.

७ **मध्यमपदलोपी** उ०—साखरभात, डाळवांगें, घरजांवई.

**टीप**—ज्या कर्मधारय समासांत पहिलें पद सामासिक विशेषण असून दुसरें पद विशेष्य असतें आणि समास करितांना पहिल्या सामासिक शब्दांतील शेवटच्या पदाचा लोप होतो त्यास **मध्यमपदलोपी** ह्मणतात.

१९६ उपमानोपमेयभावबोधक कर्मधारयांचे चार प्रकार आहेत ते एणेंप्रमाणें—**उपमानपूर्वपद, उपमानोत्तरपद, अवधारणापूर्वपद** व **अवधारणोत्तरपद.**

( **अ** ) जेव्हां पहिलें पद उपमान ( सादृश्यबोधक ) असतें तेव्हां त्यास **उपमानपूर्वपद** कर्मधारय ह्मणतात. उ०—कमलमुख, साखरलिंबू, काळपुरुष इ०.

( **इ** ) जेव्हां दुसरें पद उपमान ( सारखेपणा दाखविणारें ) असतें, तेव्हां त्यास **उपमानोत्तरपद** कर्मधारय ह्मणतात. उ०—नरसिंह, पुरुषव्याघ्र, नरशार्दूल इ०.

( **उ** ) जेव्हां पाहिले पदानें दाखविलेल्या पदार्थावर दुसऱ्या पदानें दाखविलेल्या पदार्थाचा आरोप केला असतो, तेव्हां त्यास **अवधारणापूर्वपद** कर्मधारय ह्मणतात. उ०—विद्याधन, उंबरघांट, विद्युल्लता इ०.

( **ऋ** ) ज्या कर्मधारयांत पहिल्या पदाचा दुसरे पदावर आरोप केला असतो त्यास **अवधारणोत्तरपद** कर्मधारय ह्मणतात. उ०—कृतांतकटकामलध्वजजरा-एथें **जरे**वर **ध्वजा**चा आरोप केला आहे.

## द्वंद्व.

**१९७** जेव्हां सामासिक शब्दांतील प्रत्येक नाम किंवा त्या नामांच्या अर्थाचा समाहार ( समुदाय ) प्रधान असतो तेव्हां त्या समासास **द्वंद्व** समास ह्मणतात. ह्यांतील पहिल्या प्रकारास **इतरेतरयोग द्वंद्व** व दुसऱ्या प्रकारास **समाहार द्वंद्व** ह्मणतात. इतरेतरयोग द्वंद्व नेहमीं अनेकवचनीं असतो व समाहार द्वंद्व एकवचनीं असतो. उ० आईबाप, मायलेंकरें (इतरेतरयोग द्वंद्व); भाजीपाला, घरदार ( समाहार द्वंद्व ).

**टीप**—(अ) मराठींत समाहार द्वंद्व केला असतां कधीं कधीं सामासिक शब्दानें दर्शविलेल्या पदार्थांहून अधिकांचाहि बोध होतो उ०—भाजीभाकर-एथें भाजी व भाकर ह्यांशिवाय भात, वरण वगैरे पदार्थांचाहि संग्रह होतो.

(इ) द्वंद्व समासापासून कधीं कधीं सामासिक शब्दांनीं दर्शविलेल्या पदार्थांपैकीं विकल्पानें कोणता तरी एक असा बोध होतो, तेव्हां त्यास **विकल्पबोधक** द्वंद्व समास ह्मणतात उ०—खरेंखोटें, बरेंवाईट इ०. दोन संख्यावाचक शब्दांचा ह्या रीतीनें समास झाला असतां त्या दोन संख्येमधील कोणत्या तरी संख्येचा विकल्पानें बोध होतो. उ०—पांचदहा, दहापंधरा इ०.

(उ) द्वंद्व समासास शेवटच्या नामाचें लिंग लागतें; परंतु केव्हां केव्हां एक पद पुल्लिंग व दुसरें पद स्त्रीलिंग असल्यास नपुंसकलिंग होतें. उ०—स्त्रीपुरुष, आईबाप; बहिणभावंडें, मातापितरें, इ०.

(ऋ) हातपाय, नाकडोळे, घरदार इत्यादि कांहीं द्वंद्व समासांस विभक्तिप्रत्यय जोडिले असतां पाहिल्या पदास सामान्यरूप होतें. उ०—हातापायाला, नाकाडोळ्यांनीं, घरादाराला इ०.

## बहुव्रीहि

१९८ ज्या समासांत त्यांतील पदांचा अर्थ मुख्य नसून अन्य पदार्थ प्रधान असतो त्यास **बहुव्रीहि** समास ह्मणतात.

विग्रह करितांना संबंधी सर्वनामास जी विभक्ति लागते तीवरून बहुव्रीहींचे पांच प्रकार आहेत—

(अ) **तृतीया बहुव्रीहि** उ०—कृतकृत्य (कृत ह्मणजे केलें आहे कृत्य ज्यानें तो), पूरित लोक काम इ०.

(इ) **चतुर्थी बहुव्रीहि** उ०—दुतोंडें, चौकोन इ०

(उ) **पंचमी बहुव्रीहि** उ०—निर्बळ, बेइमान इ०

(ऋ) **षष्ठी बहुव्रीहि** उ०—घारडोळ्या, चक्रपाणि इ०

(ऌ) **सप्तमी बहुव्रीहि** उ०—वीरपुरुष (वीर ह्मणजे शूर आहेत पुरुष ज्यामध्यें तो गांव).

**टीप**—विग्रह करितांना सामासिक शब्दांतील सर्व शब्दांची विभक्ति एकच असली ह्मणजे **समानाधिकरण** बहुव्रीहि व ती एक नसली तर **व्यधिकरण** बहुव्रीहि ह्मणतात.

१९९ बहुव्रीहि समासाचे आणखीही खालीं लिहिलेले प्रकार होतात.

(१) **विशेषणपूर्वपद** उ०— नीलकंठ, लंबोदर.

(२) **विशेषणोत्तरपद** उ०—गुडप्रिय (गुड ह्मणजे गूळ प्रिय आहे ज्यास तो).

(३) **उपमानपूर्वपद** उ०— चंद्रमुखी

(४) **विषयपूर्वपद** उ०— अहमभिमान (अहम् ह्मणजे मी असा अभिमान ज्यास आहे तो).

(५) **अवधारणापूर्वपद** उ०— यशोधन (यश हेंच आहे धन ज्यांचें तो)

(६) **मध्यमपदलोपी** उ०—हरिणाक्षी, मृगनयना (मृगाच्या नयना सारिखे आहेत नयन जीचे ती ).

(७) **नञ् बहुव्रीहि** उ०—अनादि (आदि नाहीं ज्यास तो).

(८) **संख्यापूर्वपद** उ०— त्रिनयन, एकदंत.

(९) **संख्योत्तरपद** उ०— उपदश (दश ह्मणजे दहाच्या जवळ आहेत ते नऊ किंवा अकरा), त्रिसप्त (तीनदां सात आहेत जीमध्यें ती ).

( १० ) **सह बहुव्रीहि**— उ०— सदार, सपुत्र, सजोड, सकर्मक, सहकुटुंब.

( ११ ) **दिगंतराल लक्षण**— (दोन दिशांच्या मधील दिशा दाखविणारा ) उ०— दक्षिणपूर्व (आग्नेयी दिशा), पश्चिमोत्तर ( वायव्य दिशा ).

१२ **व्यतिहार लक्षण**— उ० दंडादंडी ( एकमेकांस दंड ह्मणजे काठ्या मारून चाललेलें युद्ध ), लठ्ठालठ्ठी, मारामारी, बदाबदी, बुक्काबुक्की, लाथालाथी इ०.

**टीप**—( अ ) ज्या युद्धांत दोन्ही बाजूचे योद्धे एकाच साधनांनीं एकमेकावर प्रहारादि एकच क्रिया करितात तें युद्ध या समासापासून दाखविलें जातें.

( इ ) मराठी भाषेंत हा समास स्त्रीलिंगी असतो, व पहिल्या पदाच्या अंत्य स्वरास **आ** आदेश होऊन शेवटच्या पदाच्या अंत्य स्वरास **ई** आदेश होतो.

२०० समासांतील सर्व शब्द एकाच भाषेंतील असले पाहिजेत; परंतु कवितेंत हा नियम सर्वत्र आढळत

नाहीं. उ०—प्रळयवीज, पापडोह, स्वामिकाज, लोक-
लाज इ०.

तथापि भिन्न भाषेतील शब्दांचे झालेले कांहीं समास चालू भाषेंत आढळतात. उ०— राजवाडा, बापजन्मीं आगबोट, राजकारभार, आकाशदिवा, समुद्रकांठ, पाय-रस्ता इ०.

---

# वाक्यविचार.

## वाक्यरचना.

२०१ परस्पराशीं अन्वय (संबंध) असणाऱ्या ज्या शब्दांच्या समुदायानें बोलणाराच्या मनांतील भाव (अभिप्राय) पूर्ण समजून येतो त्या समुदायास **वाक्य** असें ह्मणतात.

टीप—**मळमळतें**, **उजाडतें** इत्यादि क्रियापदें एककर्तीच वाक्याच्या ऐवजीं योजण्यांत येतात.

२०२ वाक्यामध्यें क्रियापद व कर्ता, कर्म इत्यादि कारकेंहीं कधीं कधीं **अध्याहृत** असतात. उ०—'असें ह्मणतात कीं, पूर्वी मुलगा वीस वर्षांचा होईपर्यंत त्याचें लग्न करीत नसत'—एथें **लोक** हा कर्ता अध्याहृत आहे. 'करील तो भरील' एथें **करील** ह्या क्रियापदाचा कर्ता व कर्म हीं दोन्ही अध्याहृत आहेत आणि **भरील** ह्या क्रियापदाचें कर्म अध्याहृत आहे. 'भुकी तो सुखी' एथें **भुकी** ह्या वाक्याचा कर्ता व क्रियापद हीं अध्याहृत आहेत, व **सुखी** ह्याचें क्रियापद अध्याहृत आहे.

## प्रयोग.

२०३ कर्ता किंवा कर्म ह्यांच्या अनुरोधानें ह्मणजे कर्ता किंवा कर्म ह्यांचे पुरुष, वचन आणि क्वचित् लिंग ह्यांस अनुसरून जी क्रियापदाची योजना तिला, अथवा ह्यांस न अनुसरतां केवळ तृतीयपुरुषीं एकवचनीं व क्वचित् नपुंसकलिंगी जी त्याची योजना तिला **प्रयोग** असें ह्मणावें.

२०४ हे प्रयोग तीन आहेत,—**कर्तरि, कर्मणि** आणि **भावे.**

२०५ जेव्हां कर्त्याच्या अनुरोधानें ह्मणजे कर्त्याचे पुरुष, वचन व क्वचित् लिंग ह्यांच्याप्रमाणें क्रियापदाचें रूप असतें तेव्हां त्यास **कर्तरि** प्रयोग ह्मणावें.

२०६ जेव्हां कर्माच्या अनुरोधानें ह्मणचे कर्माचे पुरुष, वचन आणि क्वचित् लिंग ह्यांच्या प्रमाणें क्रियापदाचें रूप असतें तेव्हां त्यास **कर्मणि** प्रयोग ह्मणावें.

२०७ जेव्हां कर्ता व कर्म ह्यांच्या पैकीं कोणाच्याच अनुरोधानें क्रियापदाचें रूप नसून केवळ तृतीयपुरुषीं एकवचनीं व बहुशः नपुंसकलिंगी असतें, तेव्हां त्यास **भावेप्रयोग** ह्मणतात.

## कर्तरि प्रयोग.

२०८ कर्तरि प्रयोगाचे प्रकार दोन आहेत—**सकर्मक कर्तरि** व **अकर्मक कर्तरि.**

२०९ कर्तरि प्रयोगांत क्रियापद सकर्मक असतां

ल्यास **सकर्मक कर्तरि** आणि क्रियापद अकर्मक अस-ल्यास **अकर्मक कर्तरि** प्रयोग ह्मणतात.

२१० सकर्मक कर्तरि प्रयोगांत **कर्ता** प्रथमान्त किंवा प्रथमान्ताबद्दल योजिलेला शब्द किंवा वाक्य असतो, आणि **कर्म** प्रथमान्त किंवा प्रथमान्ताबद्दल योजिलेला शब्द किंवा वाक्य, अथवा चतुर्थ्यंत असतें. उ०—**तो** काम करितो, तो **जाण्याचे** किंवा **जावयाचें** यत्करितो, तो ह्मणाला **'मी जाईन'**, रामा **गाईस** बांधितो इ०.

२११ अकर्मक कर्तरि प्रयोगांत **कर्ता** प्रथमान्त किंवा प्रथमान्ताबद्दल योजिलेला शब्द किंवा वाक्य असतो. उ०—**तो** बसतो, घराला **कवलें** पाहिजेत, माझें **जायाचें** ठरलें, मला वाटतें **'तो शहाणा आहे'** इ०.

**टीप—पाहिजे** ह्या क्रियापदापासून जेव्हां **आवश्यकतेचा** बोध होतो तेव्हां **अकर्मक कर्तरि** प्रयोग असतो. उ०—भाजीला **गूळ** पाहिजे,—एथें **गूळ** हा कर्ता व **पाहिजे** हें क्रियापद आहे, ह्मणून अकर्मक कर्तरि प्रयोग होतो, आणि **भाजीला** या चतुर्थीचा अर्थ **संप्रदान** होय.

२२१ प्रथमान्ताबद्दल योजिलेले शब्द किंवा वाक्य एणेंप्रमाणें.—

(१) **णें** व **आवें** प्रत्ययान्त धातुसाधिताचें षष्ठयंत एकवचनीं रूप प्रथमान्ताबद्दल योजितात व तें क्रियापदाचा **कर्ता** किंवा **कर्म** असतें. उ०—माझें **जाण्याचें**

किंवा **जावयाचें** ठरलें, तो **शिकण्याचें** किंवा **शिकाव-याचें** नाकारतो, त्यानें **पढायाचें** पत्करिलें. एथें जाण्या-चें, शिकण्याचें, इत्यादि षष्ठ्यंत रूपें **जाणें, शिकणें** इत्यादि प्रथमान्त धातुसाधिताबद्दल योजिलीं आहेत.

**टीप**—हें षष्ठ्यंत रूप सकर्मक कर्तरि प्रयोगांत क्रियापदाचें कर्म असतें, अकर्मक कर्तरि प्रयोगांत कर्ता असतें आणि कर्मणि प्रयोगांत कर्म असतें.

(२) **णें** व **आवें** प्रत्ययान्त धातुसाधिताचें चतुर्थ्यं-त एकवचनीं रूप प्रथमान्ताबद्दल योजितात व तें क्रिया-पदाचा **कर्ता** किंवा **कर्म** असतें. उ०—पाणी **तापायला** पाहिजे, भात **निवायला** पाहिजे, त्याला **जायाला** पाहिजे, तो **घ्यायला** बघतो, त्यानें **बसावयास** सांगि-तलें—एथें तापायला, निवायला इत्यादि चतुर्थ्यंत रूपें **तापणें, निवणें** इत्यादि प्रथमान्त धातुसाधितांबद्दल यो-जिलीं आहेत. पहिल्या दोन वाक्यांत **पाणी** व **भात** हे शब्द **तापणें** व **निवणें** या धातूंचें अनुक्रमें कर्ते आहेत.

**टीप**—हें चतुर्थ्यंत रूप सकर्मककर्तरि प्रयोगांत क्रियापदाचें कर्म असतें, अकर्मककर्तरि प्रयोगांत कर्ता असतें आणि कर्मणिप्रयोगांत कर्म असतें.

(३) **तां** व **ऊन** प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययेंही प्रथमान्ताबद्दल योजितात व तीं अकर्मककर्तरि प्रयो-गांत क्रियापदाचे **कर्ते** असतात. उ०—त्याला **मारतां** उपयोगी नाहीं, त्याला **बोलून** व्यर्थ आहे. एथें मारतां,

बोलून हीं अव्ययें **मारणें, बालणें** ह्या प्रथमान्त धातुसाधिताबद्दल योजिलीं असून **नाहीं, आहे** या क्रियापदांचें अनुक्रमें **कर्ते** आहेत.

( ४ ) कधीं कधीं **वाक्य**ही प्रथमान्ताबद्दल योजितात व तें क्रियापदाचा **कर्ता** किंवा **कर्म** असतें. उ०—मला वाटतें 'तो शहाणा आहे', तो बोलला 'मी उद्यां जाईन', त्यानें सांगितलें 'रामा लबाड आहे'.

**टीप**—वाक्य हें सकर्मककर्तरि प्रयोगांत कर्म असतें, अकर्मककर्तरि प्रयोगांत कर्ता असतें व कर्मणि प्रयोगांत कर्म असतें.

२१३ अप्राणिवाचक शब्द **कर्म** असतां **प्रथमान्त** किंवा **चतुर्थ्यंत** असतो, व कवितेंत कधीं कधीं चतुर्थ्यंत असतो. उ०—तो **पत्र** लिहितो; देइल कोण अन्य **कामातें ( मोरोपंत )**.

प्राणिवाचक सामान्यनाम **कर्म** असतां **प्रथमान्त** किंवा **चतुर्थ्यंत** असतें, व प्राणिवाचक विशेषनाम **कर्म** असतां **चतुर्थ्यंत** असतें; परंतु वाक्यांत **संप्रदान** असल्यास तें कर्म **प्रथमान्त** असतें. उ०— गोविंदराव **घोडा** किंवा **घोड्यास** बांधितो; तूं **रामास** बोलाव; मी तुला **घोडा** देईन; मी तुला **मुरलीधर** दाखवितों.

## कर्मणि प्रयोग.

२१४ कर्मणि प्रयोगांत **कर्ता** तृतीयान्त किंवा चतुर्थ्यंत असतो, व **कर्म** प्रथमान्त किंवा प्रथमान्ताबद्दल योजिलेला शब्द किंवा वाक्य असतें, आणि **क्रियापद**

चालूभाषेंत तृतीयपुरुषीं असतें. उ०—**रामानें** वाघ धरिला, **मला** काम केलें पाहिजे, **बाजीरावास** पुणें द्यावें लागलें, त्यानें **देण्याचें** किंवा **द्यावयाचें** नाकारिलें, त्यानें सांगितलें **'मी जाणार आहे,'** मला **आंबा** पाहिजे, त्याला **पेरू** नको, त्यानें **पत्र** प्रविष्ट कीजे, त्वां काय **कर्म** करिजे लघुलेकरानें; इ०.

**टीप**—कवितेंत कर्मणिप्रयोगांत **क्रियापद** कधीं कधीं प्रथमपुरुषीं व द्वितीयपुरुषींही असतें, ह्मणजे त्याचें **कर्म** प्रथमपुरुषीं किंवा द्वितीयपुरुषीं **प्रथमान्त** असतें. उ०—**घातिलोंसें** बंदीं अहंकारें (**तुकाराम**); **घेतलासि** तूं पदरीं (**मोरोपंत**).

२१९ रामानें वाघाला धरिला, मला तिला पाठविली पाहिजे—इत्यादि प्रयोग जरी प्रतिष्ठित लोकांच्या बोलण्यांत नेहमीं येतात तरी ते अशुद्धच समजावे. हे प्रयोग दोन रीतीनीं शुद्ध करितां येतील.

(१) **भावे** प्रयोग समजून क्रियापद नपुंसकलिंगी एकवचनीं करावें. जसें—रामानें वाघाला धरिलें, मला तिला पाठविलें पाहिजे.

(२) **कर्मणि** प्रयोग मानून कर्म प्रथमान्त करावें. जसें—रामानें वाघ धरिला, मला ती पाठविली पाहिजे.

**टीप**—**पाहिजे** या क्रियापदापासून जेव्हां **इच्छा** या अर्थाचा बोध होतो, तेव्हां **कर्मणि** प्रयोग असतो. उ०—मला घोडे पाहिजेत—एथें **मला** हा चतुर्थ्यंत कर्ता,

**घोडे** हें कर्म व **पाहिजेत** हें क्रियापद आहे, ह्मणून **कर्मणि** प्रयोग होय.

२१६ तूं गाय बांधिलीस, तुह्मी घर बांधिलेत इत्यादि प्रयोग बोलण्यांत, आणि 'वत्से लिहिलेस उत्तम श्लोक' (**मोरोपंत**) इत्यादि प्रयोग कवितेंत जरी आढळतात, तरी ते अशुद्ध समजावे. एथें कर्मणि क्रियापदास जोडलेले **स** आणि **त** हे द्वितीय पुरुषाचे आख्यात प्रत्यय काढून टाकिले ह्मणजे हे प्रयोग व्याकरणरीत्या शुद्ध होतात. जसें— तूं गाय बांधिली; तुह्मीं घर बांधिलें; वत्से तूं उत्तम श्लोक लिहिले.

२१७ शिपायाकडून चोर धरिला जातो, मला हरभरे चावतात, ह्या जात्यानें हरभरे दळतात इत्यादि स्थळीं कोणी **कर्मकर्तरि** प्रयोग ( ह्मणजे कर्मास कर्तृत्व-विवक्षा मानून केलेली क्रियापदाची योजना ) आहे असें ह्मणतात; परंतु अर्थदृष्ट्या पहातां अशा स्थळीं कर्माला कर्तृत्व विवक्षा आहे असें दिसत नाहीं, तर कर्तृबोधक शब्दाचीच योजना केलेली आहे. सबब अशा स्थळीं **कर्मणि** प्रयोग मानावा हें बरें दिसतें.

२१८ मला किंवा माझ्यानें जें होईल तें मी करितों; मला किंवा माझ्यानें खुंटा बसतो; त्याला किंवा त्याच्यानें तो उठतो, वळतो, बधतो; इत्यादि स्थळीं **होतें, बसतो, उठतो, वळतो बधतो**, ह्याची योजना **करवतें, बसवतो, उठववतो, वळववतो, बधववतो**, ह्यांच्या द-

द्दल आहे, ह्मणून अशा स्थलींही **कर्मणि** प्रयोग मानावा हें बरें दिसतें.

### भावेप्रयोग.

२१९ भावे प्रयोगाचे दोन भेद अहेत-**सकर्तृकभावे** आणि **अकर्तृकभावे.**

२२० सकर्तृक भावे प्रयोगांत क्रियापद सकर्मक असतां त्यास **सकर्मकभावे** आणि क्रियापद अकर्मक असल्यास त्यास **अकर्मकभावे** ह्मणतात.

२२१ सकर्मकभावे प्रयोगांत **कर्ता** तृतीयान्त किंवा चतुर्थ्यंत असतो व **कर्म** चतुर्थ्यंत असतें, आणि क्रियापद नेहमीं तृतीय पुरुषीं एकवचनीं व बहुशः नपुंसकलिंगी असतें. उ०—**त्यानें** मला पाठविलें; रामानें रावणास मारिलें.

टीप—सकर्मक भावे प्रयोगांत **कर्म** बहुशः प्राणिवाचकनाम किंवा त्याबद्दल योजिलेलें सर्वनाम असतें, परंतु कवितेंत अप्राणिवाचक नाम किंवा त्याबद्दल योजिलेलें सर्वनामही आढळतें. उ०—**सत्यातें** जोडावें सुज्ञें **धर्मासि** पळ न सोडावें (**मोरोपंत**).

२२२ अकर्मकभावे प्रयोगांत **कर्ता** तृतीयान्त किंवा चतुर्थ्यंत असतो आणि **क्रियापद** नेहमीं तृतीय पुरुषीं एकवचनीं व बहुशः नपुंसकलिंगी असतें. उ०— त्यानें जावें; त्याला गेलें पाहिजे; मला जातां येतें; त्यानें जाऊं नये; त्यानें गेलें पाहिजे.

**टीप—जाईजे, करिजे, पाहिजे, बसूंनये** इत्यादि

रूपें लिंग संबंधानें बदलत नाहींत, ह्मणून तीं नपुंसक-लिंगीच असतात असें ह्मणतां येत नाहीं.

२२३ अकर्तृक भावे प्रयोगांत क्रियापदानेंच कर्त्या-चा व क्रियेचा बोध होतो, आणि कर्त्याचा बोधक निराळा शब्द नसतो व क्रियापद तृतीय पुरुषीं एकवचनीं व न-पुंसकलिंगी असतें. उ०—उजाडतें, गदगदतें, मळमळतें, पोटांत ढवळतें, कालवतें इ० ह्यासच कोणी **भावकर्तरि** प्रयोग ह्मणतात.

२२४ पाहिजे (**इच्छा** या अर्थी), नको, हवा, **आवा** प्रत्ययान्त धातुसाधितयुक्त **लाग** धातु, **तां** प्रत्य-यान्त धातुसाधितयुक्त **ये** धातु, **ला** प्रत्ययान्त धातुसा-धितयुक्त **पाह** ( पाहिजे ) धातु— ह्या धातूंचें क्रियापद असतां **कर्ता चतुर्थ्यंत** असतो.

२२५ कथा श्रवण केली, मालमत्ता संपादन केली, दूध व पाणी मिश्रण करितों इत्यादि प्रयोग आढळतात. अशा स्थळीं **अन** प्रत्ययान्त धातुसाधितापासून क्रियेच्या विशेष प्रकाराचा बोध होऊन **कर** धातूपासून क्रिया-सामान्याचा बोध होतो, ह्मणून सामान्य व विशेष ह्यांचा विशेष्यविशेषणभाव होऊन संयुक्त क्रियापद झालें आहे असें समजावें. येथें **कथा, मालमत्ता, दूध** व **पाणी** हे शब्द ‘ श्रवण केली ’, ‘ संपादन केली ’, ‘ मिश्रण करितों ’ या संयुक्त क्रियापदांचीं **कर्में** होत.

२२६ त्यानें श्लोक पाठ ह्मटले, मुलांनीं कविता तोंडपाठ केल्या, तो राजास शरण गेला, त्यानें गोष्ट

कबूल केली,—इत्यादि वाक्यांत **पाठ, तोंडपाठ, शरण, कबूल** हीं विशेषणात्मक अव्ययें समजावीं.

२२७ **अस, हो, दीस, वाट, भास** इत्यादि अकर्मक धातूंचें व **नेम, कर, योज, ह्मण** इत्यादि सकर्मक धातूंचें क्रियापद असतां, कर्तृवाचक व कर्मवाचक शब्दांपुढें अर्थ पूर्ण होण्याकरितां एखादें नाम किंवा विशेषण योजावें लागतें; त्या नामास **विधेयनाम** व विशेषणास **विधेय विशेषण** ह्मणतात. हीं विधेयनामें व विशेषणें **प्रथमान्त** असतात, व कवितेंत क्वचित् **तृतीयान्त** किंवा **चतुर्थ्यंत** असतात. उ०—बेडूक लाकडास **राजा** करितात, शिवाजीनें आपणास **राजा** ह्मणविलें; मी रोगी **बरा** केला, तिनें भाजी **गोड** केली, मी तुला **शहाणा** केलें; **ज्ञानस्वरूपें** निर्द्धारें आपण होइजे, ब्रह्माण्डादिकही घटज सेवुनियां सागरा करि **घटातें**.

**टीप — विधेय**मान किंवा विशेषण ह्यांचें लिंग वचन कर्त्याप्रमाणें किंवा कर्माप्रमाणें असतात असा नियम नाहीं. उ०—तो सीता झाला होता, तुह्मी साक्षी आहां, मी त्याला सीता केलें, मी तुह्मांस साक्षी करितों.

## विभक्त्यर्थ विचार.

२२८ अर्थसंबंधानें विभक्तींचे दोन प्रकार आहेत,— **कारकविभक्ति** व **उपपदविभक्ति**.

२२९ नामाचा क्रियेशीं जो जनकत्व ( उत्पन्न करण्याचा ) संबंध त्यास व तो संबंध ज्याकडे असतो त्या

नामासही **कारक** ह्मणतात, आणि तो संबंध दाखविणाऱ्या विभक्तीस **कारक विभक्ति** असें ह्मणतात.

२३० नामाचा नामाशीं जो संबंध तो दाखविणाऱ्या विभक्तीस **उपपद विभक्ति** ह्मणावें.

**टीप**—कारक विभक्तींनीं दाखविलेल्या अर्थास **कारकार्थ** व उपपद विभक्तींनीं दाखविलेल्या अर्थास **उपपदार्थ** ह्मणतात. हे अर्थ शब्दयोगी अव्ययेंही दाखवितात.

२३१ कारकार्थाचे प्रकार सहा आहेत,—**कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान** व **अधिकरण**.

२३२ जो स्वतंत्रतेनें ह्मणजे दुसऱ्याच्या प्रेरणेशिवायही क्रिया उत्पन्न करितो त्यास **कर्ता** असें ह्मणावें. उ० **रामा** बसतो—एथें बसण्याची क्रिया रामा स्वतंत्रतेनें करितो, ह्मणून रामा हा **कर्ता** होय.

२३३ कर्ता आणि अधिकरण ह्यांहून निराळ्या ज्या नामावर क्रिया घडते त्याला **कर्म** ह्मणावें. उ०—गाय गोठ्यांत **गवत** खाते, एथें **खा** धातूचा अर्थ पोटांत घालणें ही क्रिया, गाय हा कर्ता व गोठा हें अधिकरण यांहून निराळ्या, गवत ह्या नामावर घडते, ह्मणून **गवत** हें **कर्म** होय.

२३४ ज्या नामाचा व्यापार कर्त्याच्या प्रेरणेनें क्रियेच्या उत्पत्तीस साधन असतो, त्यास **करण** ह्मणतात. उ०—कृष्णा **लेखणीनें** लिहितो,—एथें लेखणी हें **करण** आहे, कारण तिचा व्यापार कृष्णा ह्या कर्त्याच्या प्रेरणेनें लिहिण्याला साधन आहे.

२३५ ज्याला उद्देशून देणें, करणें, सांगणें वगैरे क्रिया घडतात, त्याला **संप्रदान** ह्मणावें. उ०—शाहूनें **बाळाजी विश्वनाथास** पेशवाईचीं वस्त्रें दिलीं; शहाणे **लोकांना** सदुपदेश करितात; तो **रामाला** एक गोष्ट सांगतो.—एथें बाळाजी विश्वनाथ, लोक व रामा ह्यांना उद्देशून वस्त्रें देणें, सदुपदेश करणें व गोष्ट सांगणें ह्या क्रिया घडतात, ह्मणून **बाळाजी विश्वनाथ, लोक** व **रामा** हीं **संप्रदानें** होत.

**टीप**—देणें, करणें, सांगणें ह्या अर्थाचे जे इतर धातु त्यांचाही येथें समावेश होतो असें समजावें.

२३६ ज्यापासून एखाद्या वस्तूचा वियोग दाखवावयाचा असतो, त्यास **अपादान** ह्मणतात. उ०—बाजीराव **पुण्याहून** ब्रह्मवर्तास गेला,—एथें बाजीरावाचा पुण्यापासून वियोग दाखवावयाचा आहे, ह्मणून **पुणें** हें **अपादान** होय.

२३७ ज्या स्थानीं किंवा ज्या काळीं क्रिया घडते त्या स्थानाला किंवा त्या काळाला **अधिकरण** ह्मणतात. उ०—तो **सकाळीं** उठतो, तो **घरीं** बसतो.

२३८ **प्रथमा** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ एणेंप्रमाणें आहेत.—

( अ ) **कारकार्थ**—

( १ ) **कर्ता** उ०—**राघू** बोलतो, **नदी** वाहते.

( २ ) **कर्म** उ०—गाय **दूध** देते, विष्णूनें **पत्र** लिहिलें, तो **सोंगट्या** ( सोंगट्याचा खेळ ) खेळतो.

( ३ ) **अधिकरण** ( हिंडणें, फिरणें, चालणें इत्यादि धातूंचा योग असतां ) उ०—तो सगळें **घर** फिरला, तो चार **गांव** हिंडला.

( इ ) **उपपदार्थ**—

( १ ) **उद्देश** उ०—**गोविंदा** हा मोठा बोलका आहे, **रामा** व **कृष्णा** हे आले, **रामा, कृष्णा** व **गोदी** हीं मुलें सुशिक्षित आहेत.

**टीप**—जेव्हां एक किंवा अनेक नामांचा कर्तृत्वादि संबंध दाखविण्याकरितां त्यापुढें सर्वनाम किंवा सर्वनाम आणि जातिवाचक शब्द योजिले असतात, तेव्हां त्या नामांची विभक्ति प्रथमा असून तिचा अर्थ **उद्देश** असतो 'हा घोडा चांगला आहे'—येथें **हा** हें सर्वनाम **घोडा** याचें केवळ दर्शक आहे. '**घोडा** हा मनुष्याच्या फार उपयोगी आहे'—एथें **हा** हें सर्वनाम **आहे** या क्रियापदाचा कर्ता आहे, व **घोडा** या प्रथमेचा अर्थ **उद्देश** आहे. ह्यासच **उद्देशार्थी प्रथमा** ह्मणतात.

( २ ) **विधान** उ०—तो मनुष्य **ब्राह्मण** आहे.

**टीप**—'तो मनुष्य शहाणा आहे'—एथें **शहाणा** हें विधेय विशेषण समजावें, आणि वरील उदाहरणांत **ब्राह्मण** हें विधेय नाम आहे.

( ३ ) **अवधि** किंवा **अंतर** उ०—तो चार **कोस** चालला, तो दोन **दिवस** राहिला.

( ४ ) **इयत्ता** किंवा **परिणाम** उ०—चार **पायली** तांदूळ घेतले, एक **शेर** तूप घे.

(५) **मूल्य** उ०—आंबे तीन **रुपये** शेंकडा आहेत, हमाली चार **रुपये** पल्ला पडते, भाडें सहा **आणे** खण आहे.

(६) **प्रमाण** उ०—आंबे तीन रुपये **शेंकडा** आहेत, हमाली चार रुपये **पल्ला** पडते, भाडें सहा आणे **खण** आहे.

२३९ **तृतीया** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ एणें प्रमाणें आहेत.—

(अ) **कारकार्थ**—

(१) **कर्ता** उ०—**रामानें** लेखणी केली, **त्यानें** श्लोक ह्मणावा.

(२) **करण** उ०—विष्णू **चाकूनें** पेरू कापितो, त्यानें मला **काठीनें** मारिलें, **पाण्यानें** भांडें भर.

(३) **अधिकरण** उ०—तो **वाटेनें** बसत बसत गेला.

(इ) **उपपदार्थ**—

(१) **हेतु** किंवा **निमित्त** उ०-तो **भिडेनें** बोलत नाहीं, **गर्वानें** फुगलेला, **नावानें** प्रसिद्ध.

(२( **न्यूनता** उ०—**पायानें** लंगडा, **बुद्धीनें** मंद, **पैशानें** उणा.

(३) **संनिधान** किंवा **सामीप्य** उ०—**लोडाशीं** बैस, **दाराशीं** झाड आहे, तो नदीच्या **काठानें** चालला.

( ४ ) **सहार्थ** (तें घेऊन, त्या सहित, त्या बराबर या अर्थी ) उ०—तो एका **धोतरानें** आला, तो शंभर **स्वारानिशीं** गेला, थोराशीं वैर करूं नये, मूर्खाशीं बोलूं नको.

**टीप—निशीं** हें **नीं** आणि **शीं** ह्या प्रत्ययांच्या सं-योगानें झालें आहे.

( ५ ) **रीति** उ०—तो **डौलानें** चालतो, **घाईनें** बोलतो.

( ६ ) **अनुरोध** उ०—त्यांच्या **तंत्रानें** मी वागणार नाहीं, माझ्या **मतानें** तो शहाणा आहे.

( ७ ) **मूल्य** उ०—तीन **पैशांनीं** शेर.

( ८ ) **अवधि** किंवा **अंतर** उ०—तो चार **वर्षां-नीं** येईल.

( ९ ) **इयत्ता** किंवा **परिमाण** उ०—तो **खंडीनें** विकतो, शंभर **रुपयांनीं** बुडाला.

( १० ) **तुलना** उ०—हें कापड त्या **कापडाशीं** लागत नाहीं.

२४० **चतुर्थी** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ एणें प्रमाणें आहेत—

( अ ) **कारकार्थ**—

( १ ) **कर्ता** उ०—**त्याला** काम करवतें, **त्याला** बोलतां येतें, भात **निवायला** पाहिजे, तो **तुला** वळेल.

( २ ) **कर्म** उ०—मी **त्यास** ओळखितों, त्यानें **जा-यला** सांगितलें.

(३) **करण** उ०—एका **घावास** दोन तुकडे झाले.

(४) **संप्रदान** उ०—तो **ब्राह्मणाला** पोथी देतो.

(५) **अपादान** उ०—**डोळ्यांना** गळती लागली आहे, **नाकाला** धार लागली आहे.

(६) **अधिकरण** उ०—**भांड्याला** भोंक आहे, **दाराला** कडी आहे, **डोक्याला** पागोटें घाल.

(इ) **उपपदार्थ**—

(१) **प्रयोजन** उ०—तो **कीर्तीला** झटतो, त्यानें **तुला** पानें आणलीं आहेत, तो **गावाला** निघाला.

(२) **योग्यता** किंवा **स्थिति** उ०—धोतरें **फाटायाला** झालीं आहेत, नऊ **वाजायाला** झाले.

(३) **मूल्य** किंवा **विनिमय** उ०—**पैशाला** चार आंबे मिळतात.

(४) **कार्यकारणभाव** किंवा **जन्यजनकभाव** संबंध उ०—**अकबराला** चार मुलगे होते.

(५) **स्वस्वामिभाव** संबंध उ०—**त्याला** गांव जहागीर आहे.

(६) **अवयवावयविभाव** किंवा **अंगांगिभाव** संबंध उ०—**हाताला** पांच बोटें आहेत.

(७) **वियोग** उ०—तो शंभर **रुपयांला** बुडाला, **चाकरीला** मुकला, **सुखाला** अंतरला.

( ८ ) **प्रमाण** उ०—**चाराला** आठ तसे **पांचाला** दहा.

( ९ ) **मर्यादा** उ०—**दहाला** पांच मिनिटें आहेत, त्याला परत **यावयास** अजून दोन वर्षे आहेत.

(१०) **मोबदला** उ०—**शब्दास** शब्द, **जिवास** जीव, **बुक्कीस** बुक्की.

२४१ **पंचमी** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ एणेंप्रमाणें आहेत—

( अ ) **कारकार्थ**—

( १ ) **अपादान** उ०—तो **गांवाहून** आला.

( इ ) **उपपदार्थ**—

( १ ) **तारतम्य** उ०—रामा **कृष्णाहून** वडील आहे.

( २ ) **भेद** उ०—**जांबाहून** पेरू वेगळा आहे.

२४२ **षष्ठी** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ एणें-प्रमाणें आहेत.—

( अ ) **कारकार्थ**—

( १ ) **कर्ता** उ०—त्याचें **जायाचें** ठरलें.

( २ ) **कर्म** उ०—त्यानें **बोलण्याचें** सोडलें, सत्य **संकल्पाचा** दाता भगवान.

( ३ ) **करण** उ०—त्याच्या **बोलण्याचा** मला फार राग आला.

( ४ ) **अपादान** उ०—**शिंक्याचें** सुटलें आणि बोक्याचें पिकलें.

( ५ ) **अधिकरण** उ०—तो **दिवसाचा** निजतो आणि **रात्रीचा** जागतो.

( इ ) उपपदार्थ—

( १ ) **प्रयोजन** उ०—**उपाध्यायाचें** पागोटें, **स्नानाची** जागा.

( २ ) **स्थित्यंतर** उ० **शहाण्याचा** मूर्ख, **लोखंडाचें** सोनें, **पांढऱ्याचें** पिंवळें.

( ३ ) **मूल्य** उ०—**पावलीचें** कापड.

( ४ ) **कार्यकारणभाव** किंवा **जन्यजनकभाव** संबंध उ०—**साखरेचें** चित्र, **रामाचा** मुलगा, **दगडाची** मूर्ति.

( ५ ) **स्वस्वामिभाव** संबंध उ०—**नाना फडनविसाचा** वाडा.

( ६ ) **अंगांगिभाव** संबंध उ०—**खुर्चीचा** पाय, **हाताचें** बोट.

( ७ ) **वाह्यवाहकभाव** संबंध उ० **गाडीचा** घोडा, **मोटेचा** बैल.

( ८ ) **आधाराधेयभाव** संबंध उ०— **विहिरीचें** पाणी, **देवाचा** पाट.

( ९ ) **धर्मधर्मिसंबंध** ( वस्तूशीं गुणाचा संबंध ) उ०—**योग्यतेचा** माणूस, **गुणाचा** मुलगा.

( १० ) **अभेदसंबंध** उ०—**खादीचें** कापड, **हगवणीचा** आजार, **मुलांची** संपत्ति, **खुनाचा** अपराध, **तपाचा** श्रम.

( ११ ) **अनेक** किंवा **सर्व** ह्या अर्थी उ०—**थवेचे** थवे, **गाडीची** गाडी, **हारींच्या** हारी.

( १२ ) **योग्यता** किंवा **आवश्यकता** उ०—त्या गांवाला **जायचा** मनुष्य बघ.

२४३ **सप्तमी** विभक्तीचे कारकार्थ व उपपदार्थ येणें प्रमाणें आहेत.—

**( अ ) कारकार्थ—**

( १ ) **अधिकरण** उ०—मी **घरीं** बसतो, **स्तंभीं** बांधोनि राया.

**( इ ) उपपदार्थ—**

( १ ) **हेतु** उ०—या **कामीं** माझें नुकसान झालें.

( २ ) **विषय** उ०—त्या **कामीं** ( कामासंबंधानें ) मला विचारूं नको.

( ३ ) **पृथक्करण** ( अनेक व्यक्तींतून एक व्यक्ति घेणें ) उ०—सर्वां **भूतीं** श्रेष्ठ.

२४४ कोणा एखाद्याचें चित्त आपणाकडे वळवावयाचें असतां तद्वाचक नामाला जे प्रत्यय लागतात त्यांस **संबोधनार्थी** प्रत्यय ह्मणतात. उ०—देवा मला पाव, मुला चांगला अभ्यास कर, देवांनो मला पावा, जनहो पहा.

## वाक्यरचनेचे नियम.

२४५ वाक्यामध्यें **कर्ता कर्म** व **क्रियापद** हे शब्द सामान्यतः **अनुक्रमें** येतात. उ०—मुलें विद्याभ्यास करितात.

२४६ नाम, विशेषण, विशेषणात्मक अव्यय
क्रियापद ह्यांची **विशेषणें** बहुशः त्यांच्या **मागें**
उ०—चांगला मुलगा, अत्यंत पिवळा, फार हळू, स
चालतो.

२४७ **विधेय विशेषणें** बहुशः विशेष्याच्
येतात. उ०— पहिला बाजीराव शूर होता.

**टीप**—विशेषण ज्याचा गुण दाखविते
**विशेष्य** ह्मणतात.

२४८ विशेष्य एक असून तें **प्रथमान्त** अ
त्याच्या विशेष्यानिह्म विशेषणाचें लिंग, वचन, व
त्या **विशेष्याप्रमाणेंच** असतात. उ०—तो चां
डा, ही पांढरी चवरी, जें शहाणें मूल.

२४९ कर्तरि प्रयोगांत **अनेक कर्ते** एकपुरु
कलिंगी असून ते समुच्चयबोधक उभयान्वयी
जोडिलेले असल्यास **क्रियापद अनेकवचनीं**
उ०--रामा, कृष्णा, आणि गोविंदा आले.

२५० **कर्मणि** प्रयोगांत **अनेक कर्में** ए
एकलिंगी असून तीं समुच्चयबोधक उभयान्वयी
जोडिलेलीं असल्यास, **क्रियापद अनेकवचन**
उ०—त्यानें जोंधळे, गहूं आणि तांदूळ आणिले

२५१ कर्तरि प्रयोगांत अनेक कर्ते समु
उभयान्वयी अव्ययानें जोडिले असून त्यांतील
प्रथमपुरुषी असेल तर क्रियापद **प्रथमपुरुषी**
**वचनीं** असतें; आणि द्वितीयपुरुषी व तृतीयपु

असून ते अनेक असतील तर क्रियापद **द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं** असतें. उ० मी, तूं व तो भाऊ आहों; तूं व तो शेजारी आहां.

२९२ कर्तरि प्रयोगांत अनेक कर्ते पक्षांतरबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलेले असतील तर क्रियापद **शेवटच्या कर्त्या**प्रमाणें असतें, आणि कर्मणि प्रयोगांत अनेक कर्में पक्षांतरबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलेलीं असतां क्रियापद **शेवटल्या कर्मा**प्रमाणें असतें. उ०—मी, तूं किंवा तो **जाईल**; त्यानें खारका, मनुका किंवा खडिसाखर **आणिली** काय ?

**टीप—कर्त्या**प्रमाणें किंवा **कर्मा**प्रमाणें क्रियापद असतें असें जेथें जेथें सांगितलें आहे, तेथें तेथें क्रियापद कर्त्याच्या पुरुषवचनाप्रमाणें असून तें संभव असल्यास कर्ता किंवा कर्म ह्यांच्या लिंगाप्रमाणेंही असतें, असें समजावें.

२९३ कर्तरि प्रयोगांत अनेक कर्ते भिन्नलिंगी असून ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलेले असतील तर प्रत्येक कर्त्याचा **अन्वय** क्रियापदाशीं **वेगळाला** आहे असें दाखवावयाचें असतां क्रियापद **शेवटल्या कर्त्या**प्रमाणें असतें, आणि सर्व कर्त्यांचा क्रियापदाशीं **एकवटीनें अन्वय** दाखवावयाचा असतां क्रियापद **अनेकवचनीं** असतें व संभव असेल तेथें **नपुंसकलिंगीं** असतें. उ०—राजा व राणी **आली**

**होती** किंवा **आलीं होतीं**; राजा व राणी **येईल** किंवा **येतील.**

२९४ कर्मणि प्रयोगांत अनेक कर्में भिन्नलिंगी असून तीं समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलीं असतां प्रत्येक कर्माचा **अन्वय** क्रियापदाशीं **वेगळाला** आहे असें दाखवावयाचें असल्यास क्रियापद **शेवटल्या कर्मा**प्रमाणें असतें, आणि सर्व कर्मांचा क्रियापदाशीं **एकवटीनें अन्वय** दाखवावयाचा असतां क्रियापद **अनेकवचनीं** व संभव असेल तेथें **नपुंसकलिंगी** असतें. उ०—त्यानें घोडे व पालखी **आणिली** किंवा **आणिलीं** किंवा **आणिजे.**

२९५ कर्तरि प्रयोगांत अनेक कर्त्यांचा व कर्मणि प्रयोगांत अनेक कर्मांचा क्रियापदाशीं **एकवटीनें अन्वय** आहे असें दाखवावयाचें असेल तेव्हां त्यांच्या **पुढें** कधीं कधीं **दर्शक सर्वनाम** योजीत असतात; व तें दर्शक सर्वनाम कर्ते किंवा कर्में एकलिंगी असल्यास त्यांच्याच लिंगाप्रमाणें व अनेकवचनीं असतें, आणि कर्ते किंवा कर्में भिन्न लिंगी असतात तेव्हां तें सर्वनाम **नपुंसकलिंगी अनेकवचनीं** आढळतें. उ०—रामा, गोविंदा व कृष्णी **हीं** आलीं आहेत; शत्रूनें उंटें, घोडे व हत्ती **हीं** लढाईंत मारिलीं.

कधीं कधीं त्या सर्वनामापुढें कर्त्यांच्या किंवा कर्मांच्या जातीचें बोधक असें नाम **अनेकवचनीं** योजितात, व तें जातिवाचक नाम समुच्चयबोधक असल्यास तें **दर्शक स-**

**र्वनाम** व तें **नाम एकवचनीं** असतें, आणि नुसतें द-र्शक सर्वनाम योजिलें असल्यास त्या सर्वनामाप्रमाणें, जातिवाचक नाम योजिलें असल्यास त्या नामाप्रमाणें क्रियापद असतें. उ०--रामा, कृष्णा व गोदी **हीं मुलें** बसलीं आहेत; दोन हजार स्वार व पांच हजार पायदळ **इतकें सैन्य** रवाना **झालें** किंवा **केलें.**

२९६ एकच विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय अनेक शब्दांस जोडावयाचीं असतां तीं **प्रत्येकास** निरनिराळीं जोडावीं किंवा ते सर्व शब्द **प्रथमान्त** करून शेवटीं त्या त्या विभक्तिप्रत्ययानें किंवा शब्दयोगी अव्ययानें युक्त **हा** हें दर्शक सर्वनाम जोडावें. उ०--जलीं, स्थलीं, काष्ठीं, पाषाणीं ईश्वर आहे; रामा, गोविंदा, विष्णू **यांस** बोलाव.

२९७ अनेक प्रथमान्त विशेष्यांचें विशेषण किंवा सर्वनाम **विशेष्यभिन्न** असल्यास त्याचें लिंगवचन **जवळच्या विशेष्या** प्रमाणें असतें; परंतु तसलें विशेषण विधेय विशेषण असून त्याचीं विशेष्यें समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलीं असतात, तेव्हां त्याचें लिंगवचन **शेवटल्या विशेष्याप्र**माणें किंवा **नपुंसकलिंगी अनेकवचनीं** असतें, व तीं विशेष्यें पक्षांतरबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलीं असल्यास विधेय विशेषणाचें लिंगवचन **शेवटच्या विशेष्या**प्रमाणें असतें. उ०—त्यांच्या घरीं **पांढरेच** शेले व पागोटीं आहेत;

**ऱ्या** किंवा **ऱ्याच्या** व इतरांच्या सामान्यरूपांपुढें **च्या** हे वर्ण येतात. उ०—मला किंवा माझ्यानें किंवा माझ्याच्यानें बसवतें; त्याला किंवा त्याच्यानें पळवतें; त्यांच्यानें, तुमच्यानें, आमच्यानें हें काम करवणार नाहीं.

२६५ **करी, देई** अशा सकर्मक धातूंच्या भूतकालच्या दुसऱ्या प्रकारांतील प्रत्यय लागून होणाऱ्या रूपांचा प्रयोग सर्वदा **कर्तरिच** होतो. उ०—तो काम करी, तो अन्न देई.

२६६ **प्रयोज्यार्थक** क्रियापदाची योजना असते तेव्हां त्या क्रियापदाच्या कर्तृबोधक शब्दास **कडून, जवळून, हातीं, करवीं** इत्यादि तृतीयार्थक अव्ययें जोडितात. उ०—मी त्याच्याकडून तें काम करवितों.

२६७ उभयान्वयी अव्ययानें जोडिलेले शब्द एका जातीचे, एका विभक्तीचे व एका विभक्तिप्रत्ययाचे असतात. उ०—**भुक्ति** व **मुक्ति** देणारा; **भुक्तीचा** व **मुक्तीचा** देणारा; **भुक्ति** व **मुक्ति** ह्यांचा देणारा; मी **तुला** आणि **त्याला** सांगतों.

२६८ जेव्हां, तेव्हां, जर, तर, जरी, तरी, जेथून, तेथून, जसा, तसा, जेवढा, तेवढा, जितका, तितका इत्यादि परस्परसंबंधी शब्दांपैकीं कधीं कधीं पहिल्या शब्दाची योजना करीत नाहींत. उ०—तूं येशील तेव्हां मी जाईन.

२६९ क्रियेचा **अतिशय** किंवा क्रिया **पुनः पुनः करणें** हे अर्थ सुचवावयाचे असतां धातूची **त्रिरुक्ति**

---

होते. उ०—तो शीक, शीक, शिकतो; ती खा, खा, खाते.

२७० राजे, थोर गृहस्थ, ग्रंथकर्ते, वर्तमानपत्रकर्ते, हे स्वतांच्या संबंधानें बोलत असतां **आह्मी** किंवा **आपण** हा शब्द योजितात, आणि दुसऱ्यास थोरपणा देऊन बोलावयाचें असतां **तुह्मी** किंवा **आपण** हा शब्द योजितात.

# परिशिष्ट पहिलें.

## नामांचीं विभक्त्यंत रूपें.

टीप—कंसांतील रूपें कवितेंत येतात.

### अकारान्त पुल्लिंग शब्द.

#### ( १ ) हात.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | हात, (हातू, हातो) | हात |
| तृ० | हातानें-शीं, ( हातां, हातें ) | हातांनीं-शीं-हीं, ( हातां, हातीं ) |
| च० | हातास-ला, (हातातें) | हातांस-ला-ना, ( हातांतें ) |
| पं० | हातून, हाताहून | हातून, हातांहून |
| ष० | हाताचा-ची-चें | हातांचा-ची-चें |
| स० | हातीं, ( हातां ) | हातीं, ( हातां ) |
| सं० | हाता | हातहो, हातांनो |

#### ( २ ) उंदीर.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | उंदीर,( उंदरू ) | उंदीर |
| तृ० | उंदरानें-शीं | उंदरांनीं-शीं-हीं |
| च० | उंदरास-ला, (उंदरातें) | उंदरांस-ला-ना, (उंदरांतें) |
| पं० | उंदराहून | उंदरांहून |
| ष० | उंदराचा-ची-चें | उंदरांचा-ची-चें |
| स० | ( प्रत्यय लागून रूपें होत नाहींत. ) | |
| सं० | उंदरा | उंदरांनो. |

## ( ३ ) कापूस.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | कापूस | कापूस |
| तृ० | कापसानें-शीं | कापसांनीं-शीं-हीं |
| च० | कापसास-ला,(कापसातें) | कापसांस-ला-ना,(कापसांतें) |
| पं० | कापसाहून | कापसांहून |
| ष० | कापसाचा-ची-चें | कापसांचा-ची-चें |
| सं० | कापसा | कापसांनो |

## ( ४ ) चीक.

| | | |
|---|---|---|
| प्र० | चीक | चीक |
| तृ० | चिकानें-शीं | चिकांनीं-हीं-शीं |
| च० | चिकास-ला, (चिकातें) | चिकांस-ला-ना,(चिकांतें) |
| पं० | चिकाहून | चिकांहून |
| ष० | चिकाचा-ची-चें | चिकांचा-ची-चें |
| सं० | चिका | चिकांनो |

## ( ५ ) कूड.

| | | |
|---|---|---|
| प्र० | कूड | कूड |
| तृ० | कुडानें-शीं | कुडांनीं-हीं-शीं |
| च० | कुडास-ला, (कुडातें) | कुडांस-ला-ना,(कुडांतें) |
| पं० | कुडाहून | कुडांहून |
| ष० | कुडाचा-ची-चें | कुडांचा-ची-चें |
| सं० | कुडा | कुडांनो |

## (६) परीट.

| वि० | एकवचन | अनेकवचन |
| --- | --- | --- |
| प्र० | परीट | परीट |
| तृ० | परिटानें-शीं, परटानें-शीं | परिटांनीं-शीं-हीं<br>परटांनीं-शीं-हीं |
| च० | परिटास-ला, (परिटातें)<br>परटास-ला, (परटातें) | परिटांस-ला-ना, (परिटांतें)<br>परटांस-ला-ना, (परटांतें) |
| पं० | परिटाहून, परटाहून | परिटांहून-परटांहून |
| ष० | परिटाचा-ची-चें<br>परटाचा-ची-चें | परिटांचा-ची-चें<br>परटांचा-ची-चें |
| सं० | परिटा, परटा | परिटांनो, परटांनो |

## (७) तांदूळ

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | तांदूळ | तांदूळ |
| तृ० | तांदुळानें शीं,<br>तांदळानें-शीं | तांदुळांनीं-शीं-हीं<br>तांदळांनीं-शीं-हीं |
| च० | तांदुळास-ला, (तांदुळातें)<br>तांदळास-ला, (तांदळातें) | तांदुळांस-ला-ना, (तांदुळांतें)<br>तांदळांस-ला-ना, (तांदळांतें) |
| पं० | तांदुळाहून, तांदळाहून | तांदुळांहून, तांदळांहून |
| ष० | तांदुळाचा-ची-चें<br>तांदळाचा-ची-चें | तांदुळांचा-ची-चें<br>तांदळांचा-ची-चें |
| सं० | तांदुळा, तांदळा | तांदुळांनो, तांदळांनो |

## (८) ताईत.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | ताईत | ताईत |
| तृ० | ताइतानें- शीं<br>तायतानें-शीं | ताइतांनीं-शीं-हीं<br>तायतांनीं-शीं-हीं |

| विभक्ति | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| च० | ताइतास-ला, (ताइतातें)<br>तायतास-ला, (तायतातें) | ताइतांस-ला-ना, (ताइतांतें)<br>तायतांस-ला-ना, (तायतांतें) |
| पं० | ताइताहून, तायताहून | ताइतांहून, तायतांहून |
| ष० | ताइताचा-ची-चें<br>तायताचा-ची-चें | ताइतांचा-ची-चें<br>तायतांचा-ची-चें |
| सं० | ताइता, तायता | ताइतांनो, तायतांनो |

## ( ९ ) पाऊस.

| | | |
|---|---|---|
| प्र० | पाऊस | पाऊस |
| तृ० | पाउसानें-शीं<br>पावसानें-शीं | पाउसांनीं-शीं-हीं<br>पावसांनीं-शीं-हीं |
| च० | पाउसास-ला, (पाउसातें)<br>पावसास-ला, (पावसातें) | पाउसांस-ला-ना, (पाउसांतें)<br>पावसांस-ला-ना, (पावसांतें) |
| पं० | पाउसाहून, पावसाहून | पाउसांहून, पावसांहून |
| ष० | पाउसाचा-ची-चें<br>पावसाचा-ची-चें | पाउसांचा-ची-चें<br>पावसांचा-ची चें |
| सं० | पाउसा, पावसा | पाउसांनो, पावसांनो |

## अकारान्त स्त्रीलिंग शब्द.

## प्रकार पहिला.

## ( १० ) काच.

| | | |
|---|---|---|
| प्र० | काच | काचा |
| तृ० | काचेनें-शीं | काचांनीं-शीं-हीं |
| च० | काचेस-ला, (काचेतें) | काचांस-ला-नां, (काचांतें) |

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| पं० | काचेहून | काचांहून |
| ष० | काचेचा-ची-चें | काचांचा-ची-चें |
| सं० | काचे | काचांनो |

## प्रकार दुसरा

### ( ११ ) केळ.

| | | |
|---|---|---|
| प्र० | केळ | केळी |
| तृ० | केळीनें-शीं | केळींनीं-शीं-हीं |
| च० | केळीस-ला, (केळीतें) | केळींस-ला-ना, (केळींतें) |
| पं० | केळीहून | केळींहून |
| ष० | केळीचा-ची-चें | केळींचा-ची-चें |
| सं० | केळी | केळींनो |

### ( १२ ) तुळस.

| | | |
|---|---|---|
| प्र० | तुळस | तुळशी |
| तृ० | तुळशीनें-शीं | तुळशींनीं-हीं-शीं |
| च० | तुळशीस-ला, (तुळशीतें) | तुळशींस-ला-ना, (तुळशींतें) |
| पं० | तुळशीहून | तुळशींहून |
| ष० | तुळशीचा-ची-चें | तुळशींचा-चीं-चें |
| सं० | तुळशी | तुळशींनो |

### ( १३ ) गाय.

| | | |
|---|---|---|
| प्र० | गाय | गाई, गायी |
| तृ० | गायीनें-शीं, गाईनें-शीं | गायींनीं-हीं-शीं, गाईनीं-हीं-शीं |
| च० | गायीस-ला, (गायीतें)<br>गाईस-ला, (गाईतें) | गायींस-ला-ना, (गायींतें)<br>गाईस ला-ना, (गाईतें) |

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| पं० | गायीहून, गाईहून | गायींहून, गाईहून |
| ष० | गायीचा-ची-चें, गाईचा-ची-चें | गायींचा-ची-चें, गाईंचा-ची-चें |
| सं० | गायी, गाई | गायींनो, गाईनो |

## प्रकार तिसरा.

### ( १४ ) वरात.

| | | |
|---|---|---|
| प्र० | वरात | वराता, वराती |
| तृ० | वरातेनें-शीं, वरातीनें-शीं. | वरातांनीं-शीं, वरातींनीं-शीं-हीं |
| च० | वरातेस-ला, (वरातेतें) वरातीस-ला, (वरातीतें) | वरातांस-ला ना, (वरातांतें) वरांतास-ला-ना, (वरातींतें) |
| पं० | वरातेहून, वरातीहून | वरातांहून, वरातींहून |
| ष० | वरातेचा-ची-चें वरातीचा-ची-चें | वरातांचा-ची-चें वरातींचा-ची-चें |
| सं० | वराते, वराती | वरातांनो, वरातींनो |

## अकारान्त नपुंसकलिंग शब्द.

### ( १५ ) घर.

| | | |
|---|---|---|
| प्र० | घर | घरें |
| तृ० | घरानें-शीं-घरें, (घरां) | घरांनीं-शीं-हीं-घरीं, (घरां) |
| च० | घरास-ला, (घरातें) | घरांस-ला-ना, (घरांतें) |
| पं० | घरून, घराहून | घरून, घरांहून |
| ष० | घराचा-ची-चें | घरांचा-ची-चें. |
| स० | घरीं, (घरां) | घरीं, (घरां) |
| सं० | घरा | घरांनो |

## आकारान्त पुल्लिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### ( १६ ) मामा.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | मामा | मामा |
| तृ० | मामानें-शीं | मामांनीं-शीं-हीं |
| च० | मामास,मामाला, (मामातें) | मामांस-ला-ना, (मामांतें) |
| पं० | मामाहून | मामांहून |
| ष० | मामाचा-ची-चें | मामांचा-ची-चें |
| सं० | मामा | मामांनो |

### प्रकार दुसरा.

### (१७) आंबा.

| | | |
|---|---|---|
| प्र० | आंबा | आंबे |
| तृ० | आंब्यानें-शीं | आंब्यानीं-शीं-हीं |
| च० | आंब्यास-ला,(आंब्यातें) | आंब्यांस-ला-ना,(आंब्यांतें) |
| पं० | आंब्याहून | आंब्यांहून |
| ष० | आंब्याचा-ची-चें | आंब्यांचा-ची चें |
| सं० | आंब्या | आंब्यांनो |

## आकारान्त स्त्रीलिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### ( १८ ) पागा.

| | | |
|---|---|---|
| प्र० | पागा | पागा |
| तृ० | पागेनें-शीं | पागांनीं-शीं-हीं |
| च० | पागेस-ला, (पागेतें) | पागांस-ला, (पागांतें) |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| पं० | पागाहून | पागांहून |
| ष० | पागेचा-ची-चें | पागांचा-ची-चें |
| सं० | पागे | पागांनो |

## प्रकार दुसरा.

### ( १९ ) गंगा.

| | | |
|---|---|---|
| प्र० | गंगा | गंगा |
| तृ० | गंगानें-शीं, गंगेनें-शीं | गंगांनीं-शीं-हीं<br>गंगेंनीं-शीं-हीं |
| च० | गंगास-ला, ( गंगातें )<br>गंगेस-ला, ( गंगेतें ) | गंगांस-ला-ना, (गंगांतें)<br>गंगेंस-ला-ना, ( गंगेंतें ) |
| पं० | गंगाहून, गंगेहून | गंगांहून, गंगेंहून |
| ष० | गंगेचा-ची-चें<br>गंगाचा-ची-चें | गंगांचा-ची-चें<br>गंगेंचा-ची-चें |
| सं० | गंगा, गंगे | गंगांनो, गंगेंनो |

## इकारान्त पुल्लिंग शब्द.

### ( २० ) अग्नि.

| | | |
|---|---|---|
| प्र० | अग्नि | अग्नि |
| तृ० | अग्नीनें-शीं | अग्नींनीं-शीं-हीं |
| च० | अग्नीस-ला, (अग्नीतें) | अग्नींस-ला-ना,(अग्नींतें;) |
| पं० | अग्नीहून | अग्नींहून |
| ष० | अग्नीचा-ची-चें | अग्नींचा-ची-चें |
| सं० | अग्नी, अग्ने | अग्नींनो |

## उकारान्त पुल्लिंग शब्द.

### ( २१ ) वायु.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | वायु | वायु |
| तृ० | वायूनें-शीं | वायूंनीं-शीं हीं |
| च० | वायूस-ला, (वायूतें) | वायूंस-ला-ना, (वायूंतें) |
| पं० | वायूहून | वायूंहून |
| ष० | वायूचा-ची-चें | वायूंचा-ची-चें |
| सं० | वायू-वायो | वायूंनो |

## इकारान्त स्त्रीलिंग शब्द

### ( २२ ) प्रीति

| | | |
|---|---|---|
| प्र० | प्रीति | प्रीति |
| तृ० | प्रीतीनें-शीं | प्रीतींनीं-शीं-हीं |
| च० | प्रीतीस-ला,(प्रीतीसें) | प्रीतींस-ला-ना, (प्रीतींतें) |
| पं० | प्रीतीहून | प्रीतींहून |
| ष० | प्रीतीचा-ची-चें | प्रीतींचा-ची-चें |
| सं० | प्रीती, प्रीते | प्रीतींनो |

## उकारान्त स्त्रीलिंग शब्द

### ( २३ ) धेनु.

| | | |
|---|---|---|
| प्र० | धेनु | धेनु |
| तृ० | धेनूनें-शीं | धेनूंनीं-शीं-हीं |
| च० | धेनूस-ला, (धेनूतें) | धेनूंस-ला-ना, (धेनूंतें) |
| पं० | धेनूहून | धेनूंहून |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| ष० | धेनूचा-ची-चें | धेनूंचा-ची-चें |
| सं० | धेनू, धेनो | धेनूंनो |

### ईकारान्त पुल्लिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### ( २४ ) हत्ती.

| | | |
|---|---|---|
| प्र० | हत्ती | हत्ती |
| तृ० | हत्तीनें-शीं | हत्तींनीं-शीं-हीं |
| च० | हत्तीस-ला, ( हत्तीतें ) | हत्तींस-ला-ना,(हत्तींतें) |
| पं० | हत्तीहून | हत्तींहून |
| ष० | हत्तीचा-ची-चें | हत्तींचा-ची-चें |
| स० | हत्ती | हत्तींनो |

### प्रकार दुसरा.

### ( २५ ) माळी.

| | | |
|---|---|---|
| प्र० | माळी | माळी |
| तृ० | माळ्यानें-शीं | माळ्यांनीं-शीं-हीं |
| च० | माळ्यास-ला, (माळयातें) | माळयांस-ला-ना,(माळयांतें) |
| पं० | माळ्याहून | माळ्यांहून |
| ष० | माळ्याचा-ची-चें | माळ्यांचा-ची-चें |
| सं० | माळ्या | माळ्यांनो |

### ( २६ ) प्रवासी.

| | | |
|---|---|---|
| प्र० | प्रवासी | प्रवासी |
| तृ० | प्रवाशानें-शीं | प्रवाशांनीं-शीं-हीं |
| च० | प्रवाशास-ला,(प्रवाशातें) | प्रवाशांस-ला-नां,(प्रवाशांतें) |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| पं० | प्रवाशाहून | प्रवाशांहून |
| ष० | प्रवाशाचा-ची-चें | प्रवाशांचा-ची-चें |
| सं० | प्रवाशा | प्रवाशांनो |

## ईकारान्त स्त्रीलिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### ( २७ ) देवी.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | देवी | देवी |
| तृ० | देवीनें-शीं | देवींनीं-शीं-हीं |
| च० | देवीस, देवीला, (देवीतें) | देवींस-ला-ना, ( देवींतें ) |
| पं० | देवीहून | देवींहून |
| ष० | देवीचा-ची-चें | देवींचा-ची-चें |
| सं० | देवी | देवींनो |

### प्रकार दुसरा.

### ( २८ ) नदी.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | नदी | नद्या |
| तृ० | नदीनें-शीं | नद्यांनीं-शीं-हीं |
| च० | नदीस-ला, ( नदीतें ) | नद्यांस-ला-ना, ( नद्यांतें ) |
| पं० | नदीहून | नद्यांहून |
| ष० | नदीचा-ची-चें | नद्यांचा-ची-चें |
| सं० | नदे-नदी | नद्यांनो |

### प्रकार तिसरा.

### ( २९ ) बी.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | बी | बिया |
| तृ० | बीनें-शीं, बियेनें-शीं | बियांनीं-शीं-हीं |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| च० | बीस-ला, (बीतें) बियेस-ला, (बियेतें) | बियांस-ला-ना, (बियांतें) |
| पं० | बीहून, बियेहून | बियांहून |
| ष० | बीचा-ची-चें, बियेचा-ची-चें | बियांचा-ची-चें |
| सं० | बी, बिये | बियांनो |

## ईकारान्त नपुंसकलिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### (३०) पाणी

| | | |
|---|---|---|
| प्र० | पाणी | पाणी (क्वचित्) |
| तृ० | पाण्यानें-शीं | पाण्यांनीं-शीं-हीं |
| च० | पाण्यास-ला, (पाण्यातें) | पाण्यांस-ला-ना, (पाण्यांतें) |
| पं० | पाण्याहून | पाण्यांहून |
| ष० | पाण्याचा-ची-चें | पाण्यांचा-ची-चें |
| सं० | पाण्या | पाण्यांनो |

### (३१) मोतीं.

| | | |
|---|---|---|
| प्र० | मोतीं | मोतें, मोत्यें |
| तृ० | मोत्यानें-शीं | मोत्यांनीं, मोत्यांशीं-हीं |
| च० | मोत्यास-ला, (मोत्यातें) | मोत्यांस-ला-ना, (मोत्यांतें) |
| पं० | मोत्याहून | मोत्यांहून |
| ष० | मोत्याचा-ची-चें | मोत्यांचा-ची-चें |
| सं० | मोत्या | मोत्यांनो |

### (३२) बीं.

| | | |
|---|---|---|
| प्र० | बीं | बियें |
| तृ० | बियानें-शीं | बियांनीं-शीं-हीं |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| च० | बियास-ला, (बियातें) | बियांस-ला-ना, (बियांतें) |
| पं० | बियाहून | बियांहून |
| ष० | बियाचा-ची-चें | बियांचा-ची-चें |
| सं० | बिया | बियांनो |

## ऊकारान्त पुल्लिंग शब्द.

### प्रकार पहिला.

#### ( ३३ ) खडू.

| | | |
|---|---|---|
| प्र० | खडू | खडू |
| तृ० | खडूनें-शीं | खडूंनीं-शीं-हीं |
| च० | खडूस-ला, ( खडूतें ) | खडूंस-ला-ना, ( खडूंतें ) |
| पं० | खडूहून | खडूंहून |
| ष० | खडूचा-ची-चें | खडूंचा-ची-चें |
| सं० | खडू | खडूंना |

### प्रकार दुसरा.

#### ( ३४ ) गहूं.

| | | |
|---|---|---|
| प्र० | गहूं | गहूं |
| तृ० | गव्हानें-शीं | गव्हांनीं-शीं-हीं |
| च० | गव्हास-ला, (गव्हातें) | गव्हांस-ला-ना, (गव्हांतें) |
| पं० | गव्हाहून | गव्हांहून |
| ष० | गव्हाचा-ची-चें | गव्हांचा-ची-चें |
| सं० | गव्हा | गव्हांनो |

## प्रकार तिसरा.

### ( ३९ ) लाडू.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| प्र० | लाडू | लाडू |
| तृ० | लाडूनें-शीं; लाडानें-शीं | लाडूंनीं-शीं-हीं; लाडांनीं-शीं-हीं |
| च० | लाडूस-ला, (लाडूतें); लाडास-ला, (लाडातें) | लाडूंस-ला-ना, (लाडूंतें); लाडांस-ला-ना, (लाडांतें) |
| पं० | लाडूहून, लाडाहून) | लाडूंहून, लाडांहून |
| ष० | लाडूचा-ची-चें; लाडाचा-ची-चें | लाडूंचा-ची-चें; लाडांचा-ची-चें |
| सं० | लाडू, लाडा | लाडूंनो, लाडांनो |

## प्रकार चवथा.

### ( ३६ ) परभू.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | परभू | परभू |
| तृ० | परभूनें-शीं; परभानें-शीं | परभांनीं-शीं-हीं; परभांनीं-शीं-हीं |
| च० | परभूस-ला, (परभूतें); परभास-ला, (परभातें) | परभूंस-ला-ना, (परभूंतें); परभांस-ला-ना, (परभांतें) |
| पं० | परभूहून, परभाहून | परभूंहून, परभांहून |
| ष० | परभूचा-ची-चें, परभाचा-ची चें | परभूंचा-ची-चें, परभांचा-ची-चें |
| स० | घरभू, परभा | परभूंनो, परभांनो |

## प्रकार पांचवा.

### ( ३७ ) रू.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | रू | रू |
| तृ० | रुवानें-शीं | रुवांनीं-शीं-हीं |
| च० | रुवास-ला, (रुवातें) | रुवांस-ला-ना, (रुवांतें) |
| पं० | रुवाहून | रुवांहून |
| ष० | रुवाचा-चीचें | रुवांचा-ची-चें |
| सं० | रुवा | रुवांनो |

## ऊकारान्त स्त्रीलिंग शब्द.

## प्रकार पहिला.

### ( ३८ ) काकू.

| | | |
|---|---|---|
| प्र० | काकू | काकू |
| तृ० | काकूनें-शीं | काकूंनीं-शीं-हीं |
| च० | काकूस-ला, (काकूतें) | काकूंस-ला-ना, (काकूंतें) |
| पं० | काकूहून | काकूंहून |
| ष० | काकूचा-ची-चें | काकूंचा-ची-चें |
| सं० | काकू | काकूंनो |

## प्रकार दुसरा.

### ( ३९ ) जळू.

| | | |
|---|---|---|
| प्र० | जळू | जळू, जळवा, जळ्वा |
| तृ० | जळूनें-शीं, जळवेनें-शीं, जळ्वेनें-शीं | जळवांनीं-शीं-हीं<br>जळ्वांनीं-शीं-हीं |

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| च० | जळूस-ला, ( जळूतें )<br>जळवेस-ला, ( जळवेतें )<br>जळ्वेस-ला, ( जळ्वेतें ) | जळवांस-ला-ना, (जळवांतें)<br>जळ्वांस-ला-ना, (जळ्वांतें) |
| पं० | जळहन, जळ्वेहून<br>जळ्वेहून | जळवांहून, जळ्वांहून |
| ष० | जळूचा-ची-चें,<br>जळवेचा-ची-चें<br>जळ्वेचा-ची-चें | जळवांचा-ची-चें<br>जळ्वांचा-ची-चें |
| सं० | जळू, जळवे, जळ्वे | जळवांनों, जळ्वांनो |

## प्रकार तिसरा.

### ( ४० ) जाऊ.

| | | |
|---|---|---|
| प्र० | जाऊ | जावा |
| तृ० | जाऊनें-शीं, जावेनें-शीं | जाऊनीं-शीं-हीं<br>जावांनीं-शीं-हीं |
| च० | जाऊस-ला, (जाऊतें)<br>जावेस-ला, (जावेतें) | जाऊंस-ला-ना, (जाऊंतें)<br>जावांस-ला-ना, ( जावांतें) |
| पं० | जाऊहून, जावेहून | जाऊंहून, जावांहून |
| ष० | जाऊचा-ची-चें<br>जावेचा-ची-चें | जाऊंचा-ची-चें<br>जावांचा-ची-चें |
| सं० | जाऊ, जावे | जाऊंनो, जावांनो |

## प्रकार चवथा.

### ( ४१ ) बाजू.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | बाजू | बाजवा, बाज्वा |
| तृ० | बाजूनें-शीं, बाजवेनें-शीं बाज्वेनें-शीं | बाजूंनीं-शीं-हीं<br>बाजवांनीं-शीं-हीं<br>बाज्वांनीं-शीं-हीं |
| च० | बाजूस-ला, (बाजूतें)<br>बाजवेस-ला, (बाजवेतें)<br>बाज्वेस-ला, (बाज्वेतें) | बाजूंस-ला-ना, ( बाजूंतें )<br>बाजवांस-ला-ना, (बाजवांतें)<br>बाज्वांस-ला-ना, (बाज्वांतें) |
| पं० | बाजूहून, बाजवेहून<br>बाज्वेहून | बाजूंहून, बाजवांहून<br>बाज्वांहून |
| ष० | बाजूचा-ची-चें,<br>बाजवेचा-ची-चें<br>बाज्वेचा-ची-चें | बाजूंचा-ची-चें,<br>बाजवांचा-ची-चें<br>बाज्वांचा-ची-चें |
| सं० | बाजू, बाजवे, बाज्वे | बाजूंनो, बाजवांनो, बा-ज्वांनो |

### (४२) ऊ.

| | | |
|---|---|---|
| प्र० | ऊ | उवा |
| तृ० | उवेनें-शीं, ऊनें-शीं | उवांनीं-शीं-हीं |
| च० | उवेस-ला, ( उवेतें ) | ऊस-ला, (ऊतें ) |
| पं० | उवेहून, ऊहून | उवांहून |
| ष० | उवेचा-ची-चें<br>ऊचा-ची-चें | उवांचा-ची-चें |
| सं० | उवे, ऊ | उवांनो |

### ( ४३ ) पिसू.

| वि० | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | पिसू, पीस | पिसा, पिसवा, पिस्वा |
| तृ० | पिसूनें-शीं<br>पिसेनें-शीं<br>पिस्वेनें-शीं<br>पिसवेनें-शीं | पिसांनीं-शीं-हीं<br>पिस्वांनीं-शीं-हीं<br>पिसवांनीं-शीं-हीं |
| च० | पिसूस-ला, (पिसूतें)<br>पिसेस-ला, (पिसेतें)<br>पिस्वेस-ला, (पिस्वेतें)<br>पिसवेस-ला, (पिसवेतें), | पिसांस-ला-ना, (पिसांतें)<br>पिस्वांस-ला-ना, (पिस्वांतें)<br>पिसवांस-ला-ना, (पिसवांतें) |
| पं० | पिसूहून, पिसेहून<br>पिस्वेहून, पिसवेहून | पिसांहून-<br>पिस्वांहून, पिसवांहून |
| ष० | पिसूचा-ची-चें<br>पिसेचा-ची-चें<br>पिस्वेचा-ची-चें<br>पिसवेचा-ची-चें | पिसांचा-ची-चें<br>पिस्वांचा-ची-चें<br>पिसवांचा-ची-चें |
| सं० | पिसू, पिसे, पिस्वे, पिसवे | पिसांनो, पिस्वांनो, पिसवांनो |

### उकारान्त नपुंसकलिंग शब्द.

### प्रकार पहिला.

### ( ४४ ) तारूं.

| | | |
|---|---|---|
| प्र० | तारूं | तारवें, तार्वें |
| तृ० | तारूनें-शीं<br>तारवानें-शीं | तारूंनीं-शीं-हीं<br>तारवांनीं-शीं-हीं |

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| | तार्वानें-शीं | तार्वांनीं-शीं-हीं |
| च० | तारूस-ला, ( तारूतें ) तारवास-ला, (तारवातें) तार्वास-ला, ( तार्वातें ) | तारूंस-ला-ना, ( तारूंतें) तारवांस-ला-ना,(तारवांतें) तार्वांस-ला-ना ( तार्वांतें) |
| पं० | तारूहून, तारवाहून तार्वाहून | तारूंहून, तारवांहून तार्वांहून |
| ष० | तारूचा-ची-चें तारवाचा-ची-चें तार्वाचा-ची-चें | तारूंचा-ची-चें तारवांचा-ची-चें तार्वांचा-ची-चें |
| सं० | तारूं, तारवा, तार्वा | तारूंनो, तारवांनो, तार्वांनो |

## प्रकार दुसरा.

### ( ४९ ) सुकाणूं.

| | | |
| --- | --- | --- |
| प्र० | सुकाणूं | सुकाणूं, सुकाणें |
| तृ० | सुकाणूनें-शीं सुकाणानें-शीं | सुकाणूंनीं-शीं-हीं सुकाणांनीं-शीं-हीं |
| च० | सुकाणूस-ला, ( सुकाणूतें), सुकाणास-ला, (सुकाणूतें) | सुकाणूंस-ला-ना, ( सुकाणूं-तें) सुकाणांस-ला-ना, ( सु-काणांतें ) |
| प० | सुकाणूहून सुकाणाहून | सुकाणूंहून, सुकाणांहून |
| ष० | सुकाणूचा-ची-चें सुकाणाचा-चा-चें | सुकाणूंचा-चा-चें सुकाणांचा-चा-चें |
| सं० | सुकाणू , सुकाणा | सुकाणूंनो-सुकाणांनो |

## प्रकार तिसरा.

### ( ४६ ) लिंबू.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | लिंबू | लिंबें |
| तृ० | लिंबानें-शीं | लिंबांनीं-शीं-हीं |
| च० | लिंबांस-ला, (लिंबातें) | लिंबांस-ला-ना, ( लिंबांतें ) |
| पं० | लिंबाहून | लिंबांहून |
| ष० | लिंबाचा-ची-चें | लिंबांचा-ची-चें |
| सं० | लिंबा | लिंबांनो |

### ( ४७ ) अवाळूं.

| | | |
|---|---|---|
| प्र० | अवाळूं | अवाळें |
| तृ० | अवाळानें-शीं | अवाळांनीं-शीं-हीं |
| च० | अवाळास-ला, (अवाळातें) | अवाळांस-ला-ना, ( अवाळांतें ) |
| पं० | अवाळाहून | अवाळांहून |
| ष० | अवाळाचा-ची-चें | अवाळांचा-ची-चें |
| सं० | अवाळा | अवाळांनो |

## एकारान्त नपुंसकलिंग शब्द.

### ( ४८ ) भांडें.

| | | |
|---|---|---|
| प्र० | भांडें | भांडीं |
| तृ० | भांड्यानें-शीं | भांड्यांनीं-शीं-हीं |
| च० | भांड्यास-ला,(भांड्यातें) | भांड्यांस-ला-ना,(भांड्यांतें) |
| पं० | भांड्याहून | भांड्यांहून |
| ष० | भांड्याचा-ची-चें | भांड्यांचा-ची-चें |
| सं० | भांड्या | भांड्यांनो |

## ओकारान्त पुल्लिंग शब्द

### ( ४९ ) टाहो

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्र० | टाहो | टाहो |
| तृ० | टाहोनें-शीं | टाहोंनीं-शीं हीं |
| च० | टाहोस-ला, (टाहोतें ) | टाहोंस-ला-ना, ( टाहोंतें ) |
| पं० | टाहोहून | टाहोंहून |
| ष० | टाहोचा ची-चें | टाहोंचा-ची-चें |
| सं० | टाहो | टाहोंनो |

## ओकारान्त स्त्रीलिंग शब्द

### ( ५० ) बायको

| | | |
|---|---|---|
| प्र० | बायको | बायका |
| तृ० | बायकोनें-शीं | बायकांनीं-शीं-हीं |
| च० | बायकोस-ला, (बायकोतें) | बायकांस-ला-ना,(बायकांते |
| पं० | बायकोहून | बायकांहून |
| ष० | बायकोचा-ची-चें | बायकांचा-ची-चें |
| सं० | बायको | बायकांनो |

## ओकारान्त नपुंसकलिंगशब्द

### ( ५१ ) मोहो.०

| | | |
|---|---|---|
| प्र० | मोहो | मोहो |
| तृ० | मोहोनें-शीं | मोहोंनीं-शीं-हीं |
| च० | मोहोस-ला, ( मोहोतें) | मोहोंस-ला-ना, ( मोहोंतें ) |
| पं० | मोहोहून | मोहोंहून |
| ष० | मोहोचा-ची-चें | मोहोंचा-ची-चें |
| सं० | मोहो | मोहोंनो |